

# रानफुलांचे थवे (स्तंभ संग्रह)

लेखिका :	शुभांगी पासेबंद

9869004712

scpaseband@gmail. com



प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

9869674820




प्रकाशन : १४ एप्रिल २०१७

| | स्तंभाचे नाव | | स्तंभाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | शब्दांचे फुगे | 21 | फाटलेली धरणी |
| २ | रानफुलांचे थवे | 22 | दमलेल्या आई ची कहाणी |
| ३ | परतीच्या या वाटेवर | 23 | रान पाखरांची शाळा |
| ४ | खेकडे | 24 | गरुडझेप |
| ५ | तक्रार पेटी | 25 | द्रष्टा स्वीकार |
| ६ | कागदी फुले | 26 | या दिल कि सुनो |
| ७ | हा माझा मार्ग एकला | 27 | बुजगावणे |
| ८ | ऑल किल्ड जेसिका | 28 | बहिरा देवीचे मंदिर |
| ९ | पुढे काय होणार | 29 | एकटाच पक्षी फिरतो आहे |
| १० | पेन्सिलचे कच्चे टाचण | 30 | कोरा चित्र फलक |
| ११ | मन थकेलले संन्यासी | 31 | पण तो आहे |
| १२ | ट्रोजन हॉर्स | 32 | बंदा रुपया कि सुटे पैसे |
| १३ | नावापुरते | 33 | पुणेरी वाडे |
| १४ | कल्पना | 34 | निसर्ग राजा |
| १५ | जीवाची मुंबई | 35 | चांदण्यातील चंद्राची चाल |
| १६ | देव निदान देवळात असावा | 36 | भारद्वाजाचा शोध |
| १७ | मी का हरले | 37 | माझं इवलसं गाव |
| १८ | एक दिवस छळाचा | 38 | अपयशाचे यश |
| १९ | प्रकाशाचे कवडसे | ३९ | अोढणी |
| २० | | ४० | |



भाग२

| 1 | देवळातील देव | २8 | ज्याचा शेवट गोड |
|---|---|---|---|
| 2 | मयूर पंख | 29 | शेवटचा दिवस गोड व्हावा |
| 3 | गावाकडची माती | 30 | टायर रोटेशन |
| 4 | हक्कांशी भांडतो आपण | 31 | चैतन्याचा दिवा |
| 5 | आहे मजा जगण्यात या | 32 | दिवसांचे रकाने |
| 6 | उगवता सूर्य | 33 | मी तुम्हाला विचारते |
| 7 | हसरतों के दाग | 34 | गोविंदा रे गोपाळा |
| 8 | नाते संबंध | 35 | दोन घरटी |
| 9 | स्त्री स्वातंत्रम | 36 | पर्याय |
| 10 | बॅबिलॉन | 37 | बोलावरी डी कि कोलावेरी डी |
| 11 | विक्रम कि वेताळ | 38 | राजघराणे |
| 12 | जय श्रीराम | 39 | धकधक गर्ल |
| 13 | अप्रकाशित | 40 | श्रीराम नौका |
| 14 | एक दुपार सुस्तावलेली | 41 | कालची आपली माणसे |
| 15 | कॅमोप्लेज | 42 | बुलडोझर |
| 16 | ती वेळ आली आहे | 43 | थंडीची धुंदी |



# मनोगत

## रानफुलांचे थवे:

शुभांगी पासेबंद

भारतीय असूनही, भारतात रुळलेले असूनही, नाव नसलेल्या अनेक लहान आकाराचे फुलांच्या यादीतील, अनेक नावांची जी फुले आहेत, ती रानफुले या एकाच नावाने ओऴखली जातात. रानफुलांचे थव्यांचे, त्या मोहोराचे, कुणाला फारसे कौतुक नसते. होय, पाऊस पडताच, लाखोंचे संख्येने उगवणाऱ्या, त्या झाडा, झुडुपांना, गंधहीन पिवऴी, जांभऴी , गुलाबी फुले येतात. फुले सुकल्यावर येणारे बी, काऴया तांब्याच्या रंगाचे, तांबडे-लाल काऴे येते, या बियांपासून पुन्हा शेकडोंचे संख्येने फुले ऊमलतात. निसर्गाची ती नक्षी असते. पक्ष्यांप्रमाणे ती फुले सुंदर दिसतात. मी या फुलांचे समूहाला म्हणून, रानफुलांचे थवे म्हणते.

ही फुले, कधी पांढरी, कधी गुलमोहोरी लाल आहेत, तर कधी फुलांचा सोनमोहोरी पिवळा गालिचा पसरलेला असतो. पण ती कधी बटनाएवढी लहान , विरंगी, गंधहीन असतात. फूले शृंगार प्रधान असतात. तर या रानमोहोराला, विचार प्रधान मानता येईल. रानमोहोराची सर्व रान फुले एकदम फुलत नाहीत. जेव्हा नवी फुले फुलतात, तेव्हा तर जुन्या काहीं, फुलांना बी सुद्धा आलेले असते. कधी लहान, कधी केसरी, दहा पाकऴी आणि कधी पाच सुट्या पिवळया पाकळयांचे, जांभऴे, कधी सीतेच्या वेणी सारखे लांब, सीतेच्या आसवांसारखे थेंब, तर कधी दवबिंदुसारखे, असे विविध रुप रंग असलेल्या, या रानफुलांचा बहरसोहळा बघण्यासारखा असतो.

माझे विचार, हे स्तंभ असेच काहीसे, वेगऴे आहेत. स्वतंत्रपणे वावरणारे, वेगळया विचारांचे, विविध वेऴी ऊमटलेले, सकस विचारांचे, तसेच

निराळे वाटणारे हे स्तंभ आहेत. रानफुलांचे थव्या सारखे , रंगीत गालिच्या सारखे, एखाद्या फुलांच्या गावासारखे आहेत.

हे विचार, हे स्तंभ तुम्हाला नक्की आवडतील.

सहज फुलू द्यावे फुल,

सहज दरवळावा वास.

अधिक काही मिळवण्याचा,

करू नये अट्टाहास.

सुवास पाकळया पराग देठ,

फुल इतकीच देते ग्वाही,

अलग अलग करू जाता,

हाती काहीच उरत नाही !

******

शुभांगी पासेबंद

११ ।११।२०१७, blog:writing in a different creative way



# प्रस्तावना

आपण रानफुलांना बघून विविध विचार करतो,काही फुले खुडतो, गजरे माळतो, खूष होतो. काही रानफुले पायदळी तुडवतो. पण या फुलांभोवती, फुलांसोबत आलेले पक्षी, फुलपाखरे येतात, खुषी देतात-

लेखिका शुभांगीना दोन ओळी आठवतात, त्या म्हणतात

फुला रे फुला तुला वास कुणी दिला

फुला रे फुला तुझा रंग कसा ओला?

रानफुलांना, पावसानंतर येणाऱ्या या मोहोराला सुगंध येत नसतो. तो असता तर? या कल्पनेने छान वाटते.

शुभांगीने कदाचित म्हणूनच, या स्तंभ संग्रहाला नाव दिले आहे रानफुलांचे थवे!

शुभांगी पासेबंद यांचे, जे आहे ते सत्य सांगणारे, असे हे स्तंभ वाचकहो तुम्हाला नक्की आवडतील

" रानफुलांचे थवे”

"तुमचे मनातील आकाशात ऊडु  द्यावे

सौ वासंती घाडगे

सातारा

# १ शब्दांचे फुगे

रंगीबेरंगी फुग्यांचा जुडगा घेऊन, बागेत फुगेवाला आला, कि मुले ,त्याच्या भोवती घोळका करतात. फुगे व फुगा या शब्दाचे आकर्षण, माणसाला बालपणापासूनच असते. चौकात उभे राहून, फुगे विकणारा फेरीवाला आवाज देतो. त्याच्या दुसऱ्या हातात, रंगीबेरंगी सुवर्णवर्खी भिंगर्यांचा एक पंखा घेऊन,तो ते फुगे अधिक आकर्षक करतो. त्या फुग्यांच्या गुच्छातील, कोणताही फुगा घेतला ,तरीही मनाला, तो दुसरा घ्यायला पाहिजे होता, असे वाटते. कारण तो फुग्यांचा गुच्छ जसा सुंदर दिसतो ,तसा एक एकटाच फुगा/भिंगरी दिसत नसते. वाऱ्यावर फिरणाऱ्या त्या विविध भिंगऱ्यांमधील, एक भिंगरी आपण निवडतो. थोड्यावेळ तिच्यावर खूष होतो ,मात्र नंतर ती फिरत नाही. हिच्या पेक्षा दुसरी जी छान होती,तिचा रंग आकर्षक होता, अशी खंत वाटते. कारण त्या पंख्यांमध्ये फिरणाऱ्या एकत्र ,भिंगऱ्यांचे समूहा एवढे आकर्षण, एका भिंगरीने पूर्ण होत नाही. खऱ्या जीवनामध्ये सुद्धा मनाची आस ,त्या दोन तीन हाती आलेल्या सुखांनी,स्वप्नांनी पूर्ण होत नाही. माणसाचे मन असेच विचित्र असते. सर्व स्वप्ने समोर ठेवून ,एखादे जास्ती प्रायोंरीटीचे असेल ते स्वप्न निवडतो व त्याला वाटते हे स्वप्न पूर्ण झाले कि सर्व जिंकले. मात्र ते तसे घडत नाही.ते शक्य नसते. नवीन स्वप्ने त्याला बोलावू लागतात.

खूप आटापिटा करून काही मिळवले कि वाटते, कशासाठी केला एवढा अट्टाहास? आपण गाडीतून पुढे जातो व म्हणतो झाडे पळतात किंवा पळती झाडे पाहुया! तसेच हे हि, फसवेच ,मागे जाणारे स्वप्न, माणसाची नजर , आपण पुढे गेल्यावर मागे खेचत राहते.

ग्रास ऑन ऑदर साईड लुक्स ग्रीनर - दुरून डोंगर साजरे.



तरीही नव्या फुग्याचे आकर्षण, मनात असतेच. मग माणूस दुसरा फुगा शोधू लागतो. त्या फुग्यांचे रंगाचे आकर्षण जवळ बाळगतो. हे फुगे कधी वस्तूंचे, कधी गाड्यांचे, कधी साड्यांचे ,कधी घरांचे, कधी घोड्यांचे ,कधी सहलींचे,नोटांचे असतात. कधी कधी तर बक्षिसांचे ,भ्रामक अहंकाराचे, खोट्या सत्कारांचे सुद्धा असतात. फुगे संवेदनांचेही असतात. बोथट भावनांचे ,क्रूर वासनांचे असतात.

लेखकाला मग हे फुगे विविध परिच्छेद, स्तंभ, कविता, कथा, ललित, कादंबरी, अशा रूपांमध्ये आकर्षित करतात. ह्या शब्दांच्या फुग्यांमध्ये तो कधी रमतो. कधी त्याला वाटते, 'बाप माणूस, लेखकांपुढे आपले फुगे काहीच नाहीत. त्यांची रचना, त्यांची प्रतिभा, आपल्याला जमत नाही. काळाच्या ओघात टिकून राहणे, या फुग्यांना शक्य नाही.' तत्कालीन मासिके, सामान्यतः त्या त्या वेळी लोकप्रिय ठरणारे फुगे, हे काही काळाने फुटतात. त्या नंतर टिकते ते कालातीत साहित्य खरे असते. पुस्तकरुपी फुगे, मलमपट्टी करतात. संदेश देतात. काहीबाही सांगतात. कधी कधी अवेळी मात्र, या पुस्तकांतून बाहेर पडून भेटणारी माणसे, त्या काळाचे जीवन सांगतात. जीवनाची अपूर्णता फोलपणा, सुद्धा या फुग्यातुन जाणवतो.जीवन शैलीचे प्रतिबिंब , असे ते शब्दाचे फुगे असतात. शब्दांचे बुडबुडे अशा,या शब्दांत, तत्कालीन साहित्याला नाउमेद करायचे सुद्धा काही कारण नसते. काही काळापुरते, काही संबधितांना, आनंद व मनोरंजन देण्याची ताकद, त्या लेखनामध्ये असते. शब्दांचे फुगे , त्यावेळी तरी काही सार्थ दिलासा देतात. काहीतरी बोलतात,सांगतात,करमणूक करतात.

प्रत्येक लेखकाला कुसुमाग्रज होता येत नाही. त्यांच्या अखंड नंदादीपा सारख्या साहित्यापुढे, माझे शब्दांचे फुगे काहीच नाहीत. रानात रानफुले उमलतात. सरोवरातील निर्मल जळात कमळ उगवते व उत्तम बागांत गुलाब व टुलीप उमलतात. शंभर वर्षातून एकदा ब्रह्मकमळ उमलते. मात्र प्रत्येक फुलांचा स्वतंत्र बाणा असतो. प्रत्येक फुलाला उमलण्याचा व काही काळ आनंद देण्याचा हक्क असतो.

माझ्या लेखांची हि रानफुले, रानफुलांचे थवे, त्यातलेच आहेत. माझ्या साध्या सुध्या ,शब्दांचे फुगे,ही शब्दफुले, रानफुले वाचकांना काही काळ ,आकर्षक वाटली, तरीही मला ते आवडेल. माझ्या शब्दांची रानफुले कुसुमाग्रजांच्या जन्मशताब्दी वर्षात त्यांच्या चरणी सादर करते!

आम्हा घरी धन शब्दाचीच रत्ने
शब्दांचीच आम्ही पूजा करू



## २ रानफुलांचे थवे

मला रानफुले खूप आवडतात. त्यांना ऊमललेले ,बघून माझे मन सुद्धा फुलते. तशी जगात "फुले आवडत नाहीत" अशी व्यक्ती विरळाच असते. खरे तर सर्व फुलांचा उपयोग ,हा "बी" बनवण्यासाठी असतो. झाडांचे पुनरुरुत्पादन संस्थेचे, एक महत्वाचे अंग म्हणजे फुल होय. फुलाचे फळ होते व त्यात बी असते. आकर्षक रंग व सुगंध या मुळे फुलांकडे मन जाते. वेगऴी रंग संगती ,या मुळे ,फुलांकडे नजर जाते .फुलांचे आकर्षक रूप हे भुंग्यांना व इतर कीटकांना आकर्षित करते व त्यामुळे परागीभवन होते. फुले हि खाण्यासाठी सुद्धा वापरतात. शेवग्याची फुले, फ्लॉवर ,कोबी, लवंगा, मिरे अशा फुलांचा, अन्नात ,मसाल्यात, भाजीत उपयोग होतो. फुलांमधील मध मधमाश्या साठवतात व तो मध खाद्यान्न म्हणून मानव आहारात वापरला जातो.

रणजीत देसाई यांच्या "गंधाली" मध्ये एक वाक्य आहे. त्यात जहांगीर नूरजहाला म्हणतो, “ फुल फळांपासून मदिरा बनवणारे आम्ही अरसिक कुठे व सुंगंधी फुलांपासून अत्तर बनवणारे तुम्ही कलाकार कुठे?"

लोकप्रिय फुल असलेल्या गुलाबाची आवड, मानवाला फार पूर्वापार काळापासून आहे. गुलकंद, गुलाबपाणी, गुलाब पाकळया यांचा ऊपयोग शांतता, थंडावा व आनंद देण्यासाठी फार पूर्वीपासून केला जातो. अप्राप्य अशा स्वप्नाला गुलबकावलीचे फुल म्हणायची पद्धत आहे.

फुलाच्या रंगावरून सुद्धा भावना व्यक्त केल्या जातात. लाल गुलाब प्रेमाचे प्रतिक आहे. पांढरा गुलाब श्रद्धांजलीसाठी वापरतात. पिवळा गुलाब शांततेचे प्रतिक आहे. सतराव्या शतकात फुलांच्या माध्यमातून संदेश देण्याची,क्रिया, प्रतिक्रिया पद्धती सुरु झाली. तुर्कस्तानात सुरु झालेली हि पद्धत, पुढे जगभरात रूढ झाली व लग्न, वाढदिवस पार्टी, बक्षीस, अंतिम संस्कार, देवदर्शन, या प्रसंगी फुलांचा वापर रूढ

झाला. मृत्यू नंतर लिलीची फुले वाहिल्यास, पुनर्जन्म मिळतो असही मत आहे. फुलांचे क्षणभंगुरते मुळे, कागदी कृत्रिम फुले आली. तरीही आणि खरी फुले ,खुप महाग झाली तरीही देवाच्या चरणी, आजही ताजी फुलेच वाहिली जातात.पूर्वी अंगणातच फुलझाडे लावून, पुजेची फुले हवी म्हणून बाग लावली जाई. पुढे फुलपुडा विकणारा-टाकणारा माळी, ह्या समाजात आला. या फूल व्यापाराचे कारण काय तर ,फुलांचा सुगंध, प्रसन्नता देतो.

फुलांवरील कथा, कविता,चित्रे, ह्या कलाकृति, हमखास प्रसिध्द होतात.व्हैन गोग या लेखकाची सुर्यफुलावरील चित्रकला व विल्यम वर्डस्वर्थची डॅफोडील्स कविता, जगप्रसिद्ध झाल्या. रंग केशरी हि माझी स्वता:ची कादंबरी मला खूप आवडते. केशर हे सर्वात महाग फुल आहे. देवचाफा आणि कमळ ही देवादिकांची फुले आहेत. मंदिरातील मूर्तीमध्ये, कोरीवकामात , चित्रांमध्ये, फुलांचे महत्व असते. प्रत्येक देवाला, त्याच्या आवडीचे, खास फुल वाहायची पद्धत आहे. रवींद्रनाथ टागोरांचा काव्य संग्रह गीतांजली जग प्रसिद्ध आहे.

माझी हि पुष्पांजली गोड मानून घ्याल ना ! शब्दरूपी फुलांची ही परडी समजा! रानफुलांचे थवे समजा.



## ३ परतीच्या या वाटेवर

सामान्यांचे आयुष्यात, छंद व नोकरी, चमचा व लेखणी, कधीही एकत्र होऊ शकत नाही का? छंद अनाहत नाद देतो, पण पोट भरायला भाकरी लागते. जगात सेटल व्हायला, डोक्यावर छप्पर व सोबतीला एक छोकरा/छोकरी लागते. पुढे ,कधीतरी पायाखालची जमीन सरकते , कळते आयुष्यच हातातून सुटून गेले आहे.मग कला आठवते.

कधी करियर मध्ये पत्रकार व कलाकार, या दोन डगरींवर पाय ठेऊन, सामान्यांना तोल जाण्याची भीती वाटते. कधी मनाचे आतले, कलाकार असलेले लहान मुल रडते. त्याच्या रडण्याने वैताग येतो पण त्याला शांत कसे करावे समजत नाही. कधी वाटत आपण ब्लॅंक होऊ .... ब्लॅंक होण्याचे टेन्शन भल्या -भल्यांना असते. प्रेक्षक उठोत, बसोत, वाचक वाचोत न वाचोत ,ते आपण कलाकार म्हणून ,मनावर घ्याचे नाही, हे म्हणणे सोप्पे असते. ते पटणे अवघड असते. एकपात्री प्रयोग हा तर माझा एकटीचाच काटेरी मार्ग होता. one man standup talk show ! त्या ऊभ्या व्यक्ती कडून, मग दिलेला तिकीटाचा पैसा, वसूल करण्याकडे ,कल व वृत्ती असते. जाऊ देत उडत ,म्हणून प्रेक्षकांना neglect करता येत नाही. एकदा प्रेक्षकांशी जुळलेली तार तुटली, तर करियर चे नुकसान होते. कारण तुटली तर ती तार पुन्हा जुळत नाही. पुढची पिढी कला शिकतांना मागच्या पिढीकडे ,बघून शिकून तयार होते व नम्रता शिकते, आपणही शिकत राहतो. मात्र आताच्या पिढीला, फास्ट यश,पिझ्झा बर्गर हवा असतो. पिक करपले, बिनसले. किंवा अवकाळी पावसाने नैसर्गिक नुकसान झाले, तरीही जी पुढे जाण्याची शेतकरी ,कलाकारी वृत्ती पूर्वी होती, ती आता फरशी नाही।

कलाकार व्यसनाचे नादी लागतो. पूर्वी समाजात प्रत्येकाला स्थान होते ,वर्तमानकाऴ तर होताच होता.

भविष्यकाळ देखील होता. औंदा पिकाचे बिनसले म्हणून शेतकरी रडे ,पण पुढच्या कामाला लागे. तसेच विद्यार्थी यावर्षी "नापास तर नापास" पुढच्या वर्षी बघू ,असे म्हणत असे पण आता? आता ते अपेक्षांचे ओझे संपत नाही. वाट्याला येणारे अपेक्षा भंग संपत नाहीत. where physiology end , psychology starts ! मग मन खचते व तणावमुक्तीचा नशेचा भोज्जा शोधणे सुरु होते. खरेतर ,छोट्या छोट्या गोष्टीतून सुख शोधणे व उपभोगणे शिकायला हवे. आयुष्य इतके कठोर असते कि म्हणावे-

किसी रंजिश को हवा दो
के मैं जिंदा हु |

आज परतीचे वाटेवर वाटते,संकटे हि मानवी उपलब्धीच्या पुढे असतात. मुले आई मुळेच घडतात. आई म्हणजे ग्रेट भेट असते. A good mother teaches, great mother inspires . रोज रात्री आई, माता,माऊली, देवी ,तिच्याशी बोलले तरी बरे वाटते. मतभेदामुळे तापलेल्या ,निराश मनाला ती शांत करते. मानवाला कळते.समजते की,विसंवाद टाळावा. इतर बदलणार नाही-स्पर्धा असुरक्षितता बदलणार नाही.स्वत: बदलावे.

परतीच्या वाटेवरकळते ,जगात सुरुवातीला थेंब बावरी नक्षी, म्हणून जो पाऊस प्रिय वाटतो, तोच पुढे रिपरिप, चिखल्या, खोटा वाटू लागतो. त्याच त्या वस्तूकडे बघण्याचा आपला दृष्टीकोन, असा सापेक्ष असतो. आज जे प्रिय मलमपट्टी करणारे, तत्वज्ञान वाटते, ते उद्या भंपक ढोंगी वाटू शकते. प्रत्येकच गोष्ट सापेक्ष असते.

देवा दारी आलो मी आता

करू नको पाया परता



हे उतारवयात जाणवते. ओढे नाले नद्या आटतात, पण खारा समुद्र,कटुता,विशालता कधीच आटत नाही. भराव घातला तरी भरतीचे वेळी,किनार्याकडे,पृथ्वी कडेच पाय पसरवतो. मन व विचार तसे समुद्रा सारखे असतात,कटुता आणतात.कधी,कळ,भावना अंतरातली असली, तरच कालातीत साहित्य निर्माण होते. झाडांसारखे ,मानवानेही मूळ रोवून राहावे. जमिनीतून ओलावा शोषून जगावे.

झाडे पक्षी, सजीव, नद्या सर्व काही तिथेच असते, फक्त एकच माणूस अंती पुढे निघून जाते.

न थाम सके दमान न रोक सके
बडे करीब से उठकर जला गया कोई

असे कधी घडू नये ते,अटळ घडून जाते. परतीच्या वाटेवर बघू नये, ते बघावे लागते. डोळे मिटूनही सत्य भेडसावते. उराशी बाळगलेल्या स्वप्नांचे तुकडे गोळा करून ,मनाच्या कप्प्यात, जपून ठेऊन, पुढचे स्वप्न पाहण्यासाठी ,जीवनाच्या कुशीत शिरावे लागते. दुःख हि दोन जीवांना जोडणारी वाट असते हे वचन, आता कालबाह्य झाले आहे. हल्ली "फ्रेंड इन नीड,ही इज नॉट माय फ्रेंड" हा मंत्र आहे. अपमृत्यू नंतर, मागे उरलेला एकाकी राहतो. अश्वथाम्यासारखा ! या बाकी उरलेल्याला, मारण्यात बरेच गुन्हेगार सामील असतात. स्वतःची दुःखे कुरवाळत बसायचे, सुख सुद्धा हे लोक त्या मागे उरलेल्याला भोगू देत नाहीत. वार करतात. आता परतीची वाट आहे हे कळून ,कर्ता आधीच शोकाकुल असतो.

निसर्गाशी, सुर्य ,चंद्राशी काय भांडायचे? वार्धक्याला काय घाबरायचे? ते यायचे तेव्हा येणारच! धन जेव्हा येते, तेव्हा धनाच्या, हंड्या भोवती, विषारी नाग यावा, तसे जीवन हे मृत्यूचे भय घेऊन येतो. माणूस सहजा सहजी आतून वठत नाही, तो इच्छा मरण काय, नैसर्गिक मरण सुद्धा टाळायचा प्रयत्न करतो. रस्त्या किनारी लावलेली झाडे, आपण होळीला तोडतो, जाळतो! काय मिळवतो? सरपण, ग्लोबल वार्मिंग आहे, तरीही

जगण्याच्या आशेने, ती झाडे फांद्या कापलेल्या असूनहि, ओलावा शोधत जगायचा, प्रयत्न करतात. तसा परतीच्या वाटेवरचा, वाटसरू चाचपडतो, पण ओलावा मिळणे हल्ली ग्लोबल वार्मिंगच्या, काळात सोपे नाही. माणूस माणसाला पारखा झालाय!

काही गोष्टींचा, वेगळा धक्का, नेहमी कथेचे शेवटी, पुढे उभा राहतो. जरी आपण जगात खूप करावेसे वाटूनही, काहीही न करता आयुष्य संपवले, तरी अशी सामान्य माणसे ९९% सुखी असतात व जगणे मरणे या मधला काळ म्हणजे जीवन ,असेच, त्यांच्या बद्दल म्हटले जाते· असे आयुष्य प्रत्येकाचे असते. काहीजण अद्वितीय असतात. जसे खूप प्रेम घट्ट, पण पक्के असेल तर विरहाचे दुःख तीव्र असते. तसे असामान्य व्यक्तीचे जीवन असामान्य असते,विरह घनिष्ट असतात. पण म्हणून सामान्यांच्या जीवना बद्दल ज्या कथा लिहिल्या जातात, त्या कमी महत्वाच्या नसतात. त्या प्रातिनिधिक ठरून, सामान्यांना भिडतात. खूप भरभराटीचे, भरतीचे दिवस पाहून, पुढे मग वेदना आल्या, तर त्या चढ उताराच्या ,गोष्टीत उत्सुकता वाढते. कपट, पर्यटन, गुन्हेगारी, प्रेमकथा, युद्ध, या बद्दलच्या कथा, म्हणूनच लोकप्रिय ठरतात.जीवन म्हणजे एक शोध यात्राही असते. कुठलाही बोध न घेता, जो शोधतो, त्याला ते जीवनसार कधी मिळतच नाही. मग आत्मशोध सुरु होतो व काहीतरी मिळाले नाही म्हणून खंतहि वाटत नाही.

आसुओ ! आखो के दहालीज्पर आया न करो
घरके हालात जमानेको दिखाया न करो
लोग मुठ्ठी में नमक लेकर फिरते हैं
अपने जख्मोको दिखाया न करो

आजही कऴले नाही, मर्द क्या होता हैं ? समाजात १/३ पुरुष सभ्य. १/३ पुरुष उदासीन, १% पुरुष दुर्जन असभ्य असतात! या असभ्यांची लेखी, स्त्री म्हणजे एक शरीर होय. महीला आरक्षणाचे काय कौतुक? संरक्षण करायचे बघा! आवाज गोड



म्हणून, पुन्हा फोन करणे व बाई वश झाली नाही,मिळाली नाही, तर तक्रार करणे. अमिबा प्रमाणे हि कोपर्डी जमात वाढते आहे. खूप मोठ्या प्रमाणात, कुठे हि काम न करणारी, समाजाला निरुपयोगी, पण महीलांना उपद्रवी जमात, जन्माला येते आहे. त्यांना कसची तरी, जातीची, मतांची किंवा अन्य ढाल आहे.सभ्याना,सामान्या,निर्भया, रुपगर्विता, रुपसुंदरी,यांना सुद्धा ते मातीमोल करू शकतात. प्रत्येक स्त्री कडे "तुला काय कळते" अशा शब्दातीत, नजरेने ते बघतात. काही केल्या ,त्यांची स्त्रीला तुच्छ लेखण्याची तृषा कधीही पुरी होत नाही. वाईन आणि वुमेन आणि दुर्गुण या साठीच त्यांचा जन्म आहे,असे ते समजतात,वाईट पुरुषांचे कुवर्तन हा समाजाला लागलेला रोग आहे. तो थांबवायलाच हवे.

संपली महफिल तरीही, शब्द नाही संपलेले,

राहू दे ध्यानी रसिका ,येथे सारे ऐकलेले.

परतीच्या या वाटेवरती ,असेच काही घडले.

# ४ खेकडे

कुरूप दिसणारे, नांगीवाले, भीतीदायक रित्या पाय हलवणारे, खेकडे बिचारे, साधे असतात. खेकडे या जमातीला बदनाम करण्यात, खरेतर माणसांचाच हात आहे. खेकडे हा तसा तिरकस चालीने, आपापल्या रस्त्याने ,त्याच्याच धुंदीत जगणारा जाणारा प्राणी आहे. श्री. रत्नाकर मतकरी या लेखकांची, खेकडे नावाची अतिशय भयप्रद व चटक अशी एक प्रसिद्ध कथा आहे.(वाचा) खडकांच्या कपारीत, चिखलाच्या बिळात, खेकडे राहतात. खेकड्यांचे शरीरामधील,कवचा मधील, ते पिवळे मास खाण्यासाठी व त्याच्या पायाचे सूप पिण्यासाठी ,मानवजात उगीचच, त्या खेकड्यांची हत्या करते. कासवाला जसे देवपण माणसाने, प्रदान केले तसे ते खेकड्याच्या नशिबी का नाही? खेकडा सुद्धा पाय आत घेऊन राहू शकतोच की! खेकडा सुद्धा पाण्यात राहून कोरडा राहतोच की! पण मग माणसाला त्या खरकड्याच्या मांसावर ताव नसता मारता आला ना! म्हणून खेकड्याला वाळीत टाकण्यात आले असावे. तुम्हाला काय वाटते?

झाकण न लावता सुद्धा, एका उघड्या टोपलीत खेकडे भरले, तर ते कधीही त्या टोपलीच्या बाहेर येत नाहीत. एकमेकांचे पाय ओढून, मग सर्व खेकडे टोपलीतच राहतात. आता हा काय फक्त खेकड्यांचाच दोष आहे का? मानवांमध्ये सुद्धा, हाच हा दोष आढळतोच की! कासवाची स्थापना मंदिराच्या दारात होते. नाग सापांची,ऊंदरांची देखील पूजा होते. खेकड्यांची पूजा करणारे ,एकही देवालय नाही. सरपटणाऱ्या प्राण्यांमध्ये सुद्धा कुटुंबशाही, खानदानाचे पुढारीपण ,असावे याचेच हे उदाहरण आहे. रॉयल रेस ! एक असाध्य रोगाला कर्क रोगालासुद्धा त्या खेकड्याचे नाव देऊन ठेवले आहे. पाऊस आल्यावर मोर नाचतो, म्हणून किती कौतुक बघा ! पण खेकडे बिळा बाहेर येउन, त्यांचे पाय वेडे वाकडे करून नाचतात ना, पण मनुष्य प्राणी भलताच पार्शल, त्याला त्या खेकड्यांचे नाचाबद्दल बिलकुल कौतुक नाही. विंचवाच्या



नांगी मारण्याला, संत एकनाथांनी "विंचू चावला" या भारुडाने केवढी प्रसिद्धी दिली. खेकड्याला तसे कुणीच विचारले नाही. नक्की आपण कुठल्या मार्गाने जातोय, हे कळू न देता वाटचाल करण्याच्या, नीतीला खेकड्याची नीती ,म्हणून नाव द्यायला काय हरकत आहे? विंचवाच्या नांगीचे व विषाचे एवढे वर्णन करतात आणि खेकड्यांची मात्र नांगी हाताने मोडून, टोपलीत टाकली की तो खेकडा एकदम निरुपद्रवी जीव बनतो.! सो सॉरी!

" घोडा घाससे दोस्ती करेगा तो खायेगा क्या? “ या चालीवर "इन्सान खेकडे से दोस्ती करेगा, तो खायेगा क्या? असे म्हणायला हरकत नाही. मानवाचे खेकड्या बद्दलच्या, रोषाचे हेच कारण असावे. एका खेकड्याने माझ्या जवळ त्याची नांगी हलवून कैफियत मांडली. "काय करकर,कटकट आहे" खेकडा लेकाचा" म्हणून मी दुर्लक्ष केले.

खेकडा पुढे येवून सांगण्याची धडपड करत होता. इतर खेकडे पाय ओढत होते.

मला कऴत होते, पण इतरांच्या प्रश्नात पडायचे कशाला?

म्हणून मी दुर्लक्ष केले.खेकडा कलाकार असूनही त्या टोपलीत जगला,टोपलीत मेला.

# ५ तक्रार पेटी

तक्रार पेटी बद्दलच्या माझ्या लेखाला, इतका प्रतिसाद मिळाला, कि मला वाटते तक्रार करणे, हा मानवाचा चौथा मुलभुत हक्क असावा. अन्न, वस्त्र, निवारा,व तक्रार करणे. तक्रारी करणारे, कुणीही कुणाही विरुद्ध ,तक्रार करतात. दुःख देणाऱ्याबद्दल, सूडबुद्धीने, प्रेमाने तक्रार करतात.इतकेच काय, देवाच्या अन्याया विरुद्ध तक्रार करणारे सुद्धा असतात. एका प्रसिद्ध लेखकाने, त्यांच्या शिकवे नावाच्या,हिंदी कवितासंग्रहात देवा बद्दल तक्रार केली आहे.

हिंदी गीतांमध्ये तर तक्रारीला फार महत्व आहे

्मिलो न तुम तो हम घबराये, मिलो तो आख चुराये, हमे क्या हो गया हैं?

अशी स्वतःबद्दलची तक्रार सुद्धा केली जाते.

कधी कधी आपण तक्रार का केली नाही? हि सुद्धा तक्रार असू शकते.

" आहे न भरी, शिकवे न किये"

दिल टूट गया हम चले गये "

अशा कथांमध्ये तक्रार न करू शकल्याचे ,शल्य असते, खंत असते. अगतिकते पेक्षा शिकायतचाच भाव असतो.कधी जगाच्या दुनियादारीला कंटाळून तक्रार केली जाते.

दुनियामे आये हैं तो जिना हि पडेगा, जीवन हैं अगर जहर तो पिना हि पडेगा,

किंवा

ये दुनिया ये महफिल मेरे काम कि नही|



असे विटलेपणाचे भाव सुद्धा व्यक्त केले जातात.

"जिंदगी देनेवाले सून ,तेरी दुनियासे जी भर गया." म्हणून देवा बद्दल तक्रार करता येते!

जगात फसवणूक हा एक नेहमीचाच व्हायरस असतो, पण तक्रार कधी केली जाते?

“भरोसा किया जिस पर, उसीने हमको लुट लिया|”

विरहाने, ब्रेकअपने, दूर गेलेल्या ,शत्रु सम झालेल्या,मित्राबद्दल सुद्धा कुरकुर उरतेच.

“जुदा होके भी मुझसे,

तू मुझमे थोडी बाकी हैं!”

किंवा प्रेम कसे टिकवावे याची तक्रार होते!

“रस्मे उल्फत को निभाये तो निभाये कैसे?

दिलकी राहोंमे उठाते हैं, जो दुनियावाले,

कोई कह दे ,वो दिवार गिराये कैसे ?”

हस्ते जख्म ची तक्रार कशी वाटते? किंवा

“तेरे बिना जिंदगी से कोई शिकवा तो नही"

कधी कधी नाईलाजाने, कुणाच्या तरी राजकारणाने ,तिसर्यालाच शिक्षा होते.

"तेरे लिये हम हैं जिये, अांसुओको पिये" अशी त्यांच्या बद्दल तक्रार होते.

विरहाचे ते दिवस कसे गेले यांची तक्रार होते.

“तुमबिन जीवन कैसे बिता पुछो मेरे दिलसे”

किंवा

“दिल धुंडता हैं फिर वही फुरसत के रात दिन" मध्ये फुरसत हरवल्याची तक्रार आहेच.

नाते संबंध म्हटले कि अपेक्षा आल्या, अपेक्षाभंग आला व तक्रार हि अाली !

“तुम्हे भी हैं शिकायत, मुझे भी तो गिला हैं!

यही शिकवे हमारी ,मुहब्बत का सिला हैं!”

कधी तरी मग अटळ अश्या त्या ब्रेकअप ला तोंड द्यावे लागते. थोडीसी ग्रेस दाखवून दूर व्हावे लागते.

“मेरी किस्मतमे तू नही शायद
मै तेरा इंतजार करता हुं|”

किंवा

“चलो एकबार फिरसे अजनबी बन जाये हम दोनो|”

नशिबा बद्दलची तक्रार तर आपण नेहमीच करतो

"न था मंजूर किस्मत को
न थी मर्जी बहारो कि

नही तो इस गुलिस्ता में

कमी थी क्या नजारोन्की”



आठवणीं बद्दल राग येतो, शाप दिले जातात, विरहाच्या दिवसात ,त्या न जाणाऱ्या दिवसांना त्या काळाला पण दोष देतात!

“बिछडे भी तो हम बस कल परसो
जीयुंगी मैं कैसे इस हाल में बरसो

तेरी याद क्यो आयी, हाय लंबी जुदाई|”

दिल चोरणारा, अशी त्या प्रियकराच्या बद्दलची तक्रार, बेवफा अशी तिच्या बद्दल तक्रार, पैसोंकी भूखी दुनिया- अशी दुनिये बद्दल तक्रार, इन्सान के दुश्मन रिवाज ,म्हणून त्या रिवाजांची तक्रार असते.

“ए गमे दिल क्या करू?” अशी त्या दुखावलेल्या दिला बद्दल सुद्धा तक्रार केली जाते.

देवा बद्दल सुद्धा तक्रार करणारे असतात,

‘पत्थर के देवता मिले" किंवा

"अंधे जहाके अंधे रस्ते जाये तो जाये कहॉ ! अगतिकतेने प्रार्थना करून

“मुझे प्यार कि जिंदगी देने वाले
कमी गम न देना ख़ुशी देने वाले
न देना शिकायत के शिकवे”

म्हणून तक्रारीला संधी मिळू नये म्हणून आणि शेवटी बघा स्वतःबद्दलच तक्रार केली जाते.

“किस लीये मैने प्यार किया?
दिलको युं हि बेकरार किया
शाम सवेरे तेरी राह देखी

रात दिन इंतजार किया”

या तक्रारी बद्दल काय म्हणणार ?

माहेरवाशिणीची तक्रार

“राजबन्सी पाखरा
नको जाऊस माहेरा
तुझ्या तक्रारी ऐकाया
नाही तिथे तुला थारा
चोचीमधील दुःख घेऊन
निपचित पड तू सासरा !

कधी अगदी वेगळी तक्रार-

न गिला होगा न शिकवा , न शिकायत होगी
अर्ज हैं के सुनलो ,तो इनायत होगी
तू प्यार करे या ठुकाराये, हम तो हैं तेरे दिवानोमें |”

प्रत्येकाची तक्रार वेगळी, प्रत्येकाची तक्रार पेटी सुद्धा वेगळी असते.

“न कर सके शिकायत, बडे करीब से उठ कर चला गया कोई|”

कधी बोलू न शकल्याची खंत असते.

“उनको ये शिकायत हैं, के हम कुछ नाही कहते,
अपनी तो ये आदत हैं ,के हम कुछ नाही कहते!”

कधी आपण उगीच बोललो ,अशीही तक्रार असते.कधी बोललो नाहि ही असते।



"मुखवटे चढवले कि वाटते,
सर्व काही अालबेल आहे.
मुखवट्यां मागे मात्र
विचित्र घालमेल आहे."

आतल्या तक्रारी आतच राहतात, अश्वथाम्याने तक्रार कुणाजवळ करायची?

कधी कधी ज्याला प्रेम मिळाले तो दुःखी , ज्याला प्रेम मिळत नाही, तो हि दुःखीच असतो!

एकूण काय तक्रार असतेच.

"किताबो मे छपते हैं
चाहत के किस्से
हकीकत कि दुनियामे ,
चाहत नही हैं|"

आता मनापासून खरे सांगा, हि शेवटची तक्रार शंभर टक्के खरी आहे ना?

# ६ कागदी फुले

लहानपणी रस्त्यातील चौकातील , कागदी भिंगरी लहान मुलाला हवीशी वाटते आणि तेव्हापासूनच कागदी फुलांचे आकर्षण, त्यांची पाठ सोडत नाही.

"कागजके फुल जहां खिलते हैं, बैठ न उन गुलजारोमे"

असे म्हणणारा गुरु दत्त सुद्धा, त्या कागदी फुलांनी फसला. त्याच्या सर्वोकृष्ट चित्रपटाचे नाव "कागजके फुल" असे आहे. दुर्दैवाने हा चित्रपट चालला नाही. मात्र त्यातील एक गाणे नेहमीच प्रत्येक व्यक्तीला जीवनात कधी न कधी काही क्षण तरी अस्वस्थ करते.

वक्त ने किया क्या हसीन सितम,
हम रहे न हम तुम रहे न तुम || धृ|
बेकरार दिल इस तरह मिले,
जिस तरह कभी हम जुदा न थे
हम भी खो गये ,तुम भी खो गये,
एक राह पर चलके दो कदम ||१||

आयुष्यात जे मिळते, ते नाकारण्याचा हक्क, प्रत्येकाला नसतो. पूर्वी कधीतरी तो नकाराधिकार चुकीच्या ठिकाणी, वापरून, मानव दुःखी झालेला असतो. खूप खूप सुखाची अपेक्षा ठेवा. "थिंक पॉझीटिव्ह" अशी सूचना देवून, स्वप्ने पाहून, ती सत्य होतातच, असे नाही. रंग केशरी, हा रंग, वेगवेगळया काळी, वेगळी भावना देऊन जातो. फुलांचा खूप आकर्षक टवटवीत गुच्छ ,कागदी फुलांचा सुद्धा असू शकतो. कुंडीतील सुंदर क्षणभंगुर फुलां पेक्षा, कागदी फुलांचे आकर्षण, मानवाला वाटते.तो व्यवहार असतो व तिथूनच इंद्रियांनी केलेली फसवणूक सुरु होते.गाथा, ग्राम गाथा, संग्राम गाथा, प्रेमगाथा ह्या कधी कधी कागदीच उरतात.



कधी जीवांची दुर्दैवी कथा अशा वळणावर येते, कि वाट सापडत नाही.

"वक्त ने किया क्या हसी सितम" म्हणावे लागते.

जायेंगे कहां, कुछ पता नही

चल पडे मगर, रास्ता नही

क्या तलाश हैं, कुछ पता नही.

बून रहे हैं दिल, ख्वाब दम बदम ||२||

प्यासा नंतरची,अधिक तीव्र भावना, कागजके फुल मध्ये येते. सुंदर गोष्टीना असणारा क्षणभंगुरतेचा शाप व वाईट कागदी, कृत्रिम गोष्टींचे चिरंतन आकर्षण यातून काय निवडावे?

ते न कळून फसण्याची वेळ नेहमी जीवनात येते.

निर्णय कोणताही घ्या तो "सितम"च असतो का?!

# ७ हा माझा मार्ग एकला

एक दिवा काय करू शकतो? हजारो ज्योती पेटवतो.

एक स्त्री काय करू शकते? हजारो स्त्रियांना प्रेरणा देते.

एकटीच्या त्या मार्गावर चालण्यात, सुवर्णा ताई रावळ ना अनेकजणी साथ देऊन ,त्यांच्या शिक्षण क्षेत्रात सहकार्य करतात, मात्र उत्कर्षासाठी संघर्ष करीत ,आपल्या आदर्श अशा ध्येयवादाकडे जाणाऱ्या सुवर्णा ताईचा, हा मार्ग एकट्याचाच आहे. सोलापूर येथील टेंभूर्णी या गावी दहावी पर्यंत शिक्षण झाल्यावर ,बीएससी सोलापूर येथे केले होते. एमएससी  पुणे युनिव्हर्सिटीत व पी एच डी ,इनस्टीट्युट ऑफ सायन्स मुंबई येथे झाले. त्या काळी शाळा गावात एकच होती, मात्र त्या शाळेमुळेच, संस्कारांची पाळेमुळे ,खोलवर रुजली. प्रत्येक विद्यार्थ्यावर, खास लक्ष देणारे शिक्षक, त्या काळी त्या गावी होते.खुप काळ लोटला व पीएचडीला गेल्यावरही, आजही त्यांना शाळाच आठवते. पी एच डीला त्यांचे गाईड ,गायनॉकॉलॉजीत ,उंदरावर संतती नियमनाचा विषय घेऊन, संशोधन करीत होते. त्यांच्या मार्गदर्शनात सुवर्णा ताईंना डॉक्टरेट मिळाली. ज्या वेळी त्या एम एससी झाल्या त्यांचा बुध्यांक, अति उच्च असल्यामुळे, आय ए एस  ला सुद्धा ,त्या पास झाल्या होत्या. मात्र शिक्षण क्षेत्रात कार्य करणे, हे ध्येय त्यांनी ठरवले होते. आदर्शांचे गोष्टी ,शाळेच्या फळयावर शोभतात, असा अनुभव आपल्याला येतो, तेव्हा मन खिन्न होते. मात्र हेच संस्कार व आदर्श जर समाजात बिंबवायचे असतील तर, ते काम फक्त शिक्षकच करू शकतो. हे सत्य त्यांनी जाणले होते.



शिकवण्याची गोडी असल्याने, त्या जेव्हा मुंबई विद्यापीठात ,एकवीस दिवस ट्रेनिंगला गेल्या ,तेव्हा युनिव्हरसिटीचे डायरेक्टर श्री वालीचा, यांनी "यु आर बॉर्न टीचर" असा संदेश दिला.लवकरच आत्मपरीक्षणाने, सुवर्णाताईनी ,आपल्यातील समाज निष्ठा व राष्ट्र निष्ठा तत्वे रुजवण्यासाठी, शिक्षकी पेशाच सर्व श्रेष्ठ आहे, याची खुणगाठ बांधली. विद्यार्थ्यांसाठी सर्वकाही, सर्व वेळ! हे त्यांचे तत्व आहे. डॉक्टर हा जसा २४ तास डॉक्टर असतो, तसा शिक्षक हि २४ तास शिक्षक असतो. शिक्षकाने घड्याळाच्या काट्यां वर,स्वत:ला बांधून काम करू नये, असे त्या म्हणतात.

२००८ सालचा मुंबई विद्यापीठाचा आदर्श शिक्षक पुरस्कार त्यांना मिळाला आहे, त्या भिवंडीच्या बी.एन एन कॉलेज मध्ये प्राध्यापिका आहेत. स्वामी विवेकानंदांच्या विचारांचा पगडा त्यांच्या विचारांवर असल्यामुळे, कर्मयोगात सन्यस्त राहावे, हे त्या मानतात, प्रतिकूल परिस्थितीशी दोन हात करून व्यक्ती अधिकच यशस्वी होते.हे त्यांच्या कडे बघून जाणवले.

घटा में छुपकर सितारे फना नही होते.
अंधेरी रात के दिलमे दिये जलाके जियो|

हे त्यांचे विचार आहेत. ट्राजेडी is an opportunity for learning . त्या ठाणे जनता सहकारी बँकेच्या ५  वर्ष डायरेक्टर होत्या व तिथेही त्यांनी उच्च तत्वांचाच पुरस्कार केला.कलियुगात फक्त आर्थिक विकास हा तत्कालीन विकास, हल्ली बर्याच ठिकाणी अपेक्षित असतो. मात्र वैचारिक पाया असलेला मुल्य विकास, हाच खरा विकास आहे. हे तत्व व सद्विचार, हेच कायम राहतात. सुखाच्या ,वैभवाच्या, तत्कालीन भ्रामक प्रतिमा, यांच्या पेक्षा सद्शील व सदिच्छा, याच समाजाला प्रगतीकडे नेतील व सद्गुणांचा विकास खरा विकास आहे. असे त्या म्हणतात. वाईटाचा बोलबाला झाला ,तरी एखादाच, दिवा अंधाराच्या पटलावर ,उठून दिसतो,अंधार दूर करतो, हे सत्य मला जाणवले.सुवर्णा ताईंना सलाम !

# ८ ऑल किल्ड जेसिका

दुसऱ्याच्या नाकर्तेपणामुळे जेसिका वारली व तो गुन्हेगार,म्हणे, एकदाचा कसा तरी, कधीतरी सुटला. तसेच अनेक गुन्हेगार अनेक जेसिकांना त्रास देतात. व "नो वन किल्ड हर " हा निष्कर्ष निघतो. तसा विचार केला, तर मला कधीही खास वेगळा, चेहरा नव्हता, मी त्या गर्दीतील एक स्त्री होते व फक्त विचारांनी वेगळी होते. त्यामुळे मला ,माझे विचार लिहावेसे वाटत होते. "स्त्री" हि काही टुकार, अविचारी लोकांना ,नेहमीच स्वस्त वाटते. हा प्रदेश ,एक लहान गाव एक गट, गमरट गट होता. त्यांचा ढिला कारभार! खरेतर दिवस किती मोठा सतो, किती काम होऊ शकते. पण इथे वेळ घालवला जाई. हुशार लोक वेळेला मान देतात. इथे टाईम सेन्सच नव्हता. त्यात बाईला सन्मान द्यावा, हि वृत्ती नव्हती. मी नाराज व्हायचे. तरी कलेने कवितेमुळे जे विद्रूप असते, ते सुद्धा सुंदर दिसते,तसे सुविचार सजवायचे.

पण मन हऴवे झाले, कि काही गोष्टी सहन होत नाहीत. जे मनात असते, ते व्यवहारात दाखवता येत नाही. आपण एक अलिप्त, असे बेट बनतो. मी हातचे राखून, प्रेमात,कामात, ध्येयात ,मागे पडू शकते का? मी तसे दोन्ही डगरांवर सावध चालत राहिले. ब्लॉगवर लिहायला सुद्धा वेळ नसे, मन ब्लॅक होई. कसदार लिहिणे जमत नाही तर "ट" ला "ट" "र" ला "र" लावून लिहू नये.कैकदा असे वाटून,मला कधी नुसतेच बसावेसे वाटे. कामाच्या गडबडीत, मी भेलकांडत काम करी, पण मनाचा एक कोपरा ,कुंवारा कोपरा राहीला होता. खरे तर माध्यमांची साहित्याची ताकद मला आवडते. पण मी त्या रेसमध्ये मागे होते. बोलण्या लिहिण्यापेक्षा, ऐकून व वाचून खूप



शिकावेसे वाटे. यश सोपे नसते. चिकाटी हवी, पण या रेटरेस च्या स्पर्धेत, मी खूपच साधी होते. अव्यवहारी होते.

एका पत्राची वीस वर्ष आयुष्याची वाट पहिल्या नंतर,कर्नलला,ते पत्र कधीच येणार नाही हे कळवणारी " no one wants colonel " हि कादंबरी वाचून, मला वाटले, मी वीस वर्ष, त्या सुंदर पत्राची वाट पाहिली. जे अस्तित्वातच नाही. चंद्राची कोर रोज दिसत नाही ,तशा कविता रोज जन्मत नाहीत. माझीच संवेदना टोकदार होती. बाकी जग बोथटच होते. कित्येकदा माझ्या प्रश्नांच्या वेळी, जणू कळलेच नाही,असे दाखवणारी माणसे,ते लोकच, पुढे "नो वन किल्ड जेसिका "घडवतात. एकदा या लोकांची शेपूट घालण्याची व प्रश्नां पासून पळून जाण्याची वृत्ती कळली ,कि टिकाकारांचे रंग बघूण,तोंडाची चवच निघून जाते. त्या रसिक लोकांवरचा विश्वास उडतो व स्वतःच्या अस्तित्वावरच सुद्धा उडतो. जगातल्या चांगुलपणावरचा सुद्धा भरोसा वाटेना होता. जेसिका सर्वत्र आहेत. भिक मागणार्यांकडून, त्रास देणाऱ्यांकडून काही शिकावे इतके, ते त्यांचे क्षेत्रात हुशार चतुर असतात. अगदी खेडोपाडी टीव्ही पोचला, पण ह्याने करमणुकित रमणारे इडीयट घडवले,विचारी जन घडवले नाहीत.

मला सत्याची कटू जाणीव झाली. जेसिकाची रिस्क कळली. मी आव्हान तर स्वीकारलं, पण खचले सुद्धा होते. वास्तवाने स्टोंकरच्या त्रासाने, कटू सत्य बघून वाटले. upcountry social work is to write !

पण ऑल किल्ड जेसिका

मी या गावी का आले?

मी बदली का घेतली?

सर्वच स्त्रिया असुरक्षित असतात का?

मला हेच आयुष्य दुसऱ्यांदा जगण्याची संधी मिळाली तर? रिवाइंड करून पुन्हा आपण आयुष्याच्या एखाद्या वळणावर जाऊन थबकले आणि तिथून पुन्हा जगण्याची सुरुवात करण्याची संधी मिळाली तर? मी संथ, सुरक्षित व वेल टू डू ,जगले असते. मी इथे येउन फसले! आठवा तो काळ, जेव्हा तुम्हाला सल्ला, आधार,मार्गदर्शन किंवा पैसे, यातील काहीतरी हवे होते व निर्णय नक्की होत नव्हता. रात्र रात्र जागून, रडून उशी भिजवूनहि ,काय करावे सुचत नव्हते. अगदी उद्या कधीच उगवू नये, आत्महत्या करावी असा सुद्धा विचार मनात आला असेल. पण पळून जाणेही शक्य नव्हते. लढून यश मिळो न मिळो, त्या संकटाला सामोरे जायचेच होते.

तशी ,जेसिका ,

अंधाऱ्या रस्त्यात वाट चाचपडत पुढे गेलीच ना!

आभिसारिका टिकून राहिली ना

करियर करणे म्हणजे सोपे नसते, स्त्री विषयक विकृतीचा व्हायरस समाजात आहे. जीवनात काही अगम्य प्रश्न असतात. पैसे, नाते संबंध, मृत्यू, गुन्हेगारी, फसवणूक यामुळे, कधी कधी काही प्रश्नापासून पळून जावे लागते. अचानक मिल बंद पडते. नोकरी जाते. पूर्वी वेळ वाचवण्यासाठी, तारेवरची कसरत केली असते व आता रिकाम्या वेळेचे, काय करायचे हा प्रश्न असतो. पण कधी आपणहून कठोर  निर्णय घ्यावा लागतो. कधी नाईलाजाने नोकरी जाते. मग अज्ञातात उडी घ्यावी लागते. नवी वाट शोधावी लागते. आजूबाजूच्या लोकांच्या टीकेला महत्व देवून, आपण खचून जातो. आपली वाट आपल्याला, चालावीच लागते. खरे तर ,त्रास देणारा आपल्याला त्रास देत नाही ना,आपण करून घेतो ! मी त्या वेळी लोकांची ‘तिची ती बघून घेईल’ अशीही जनवृत्ती बघितली!

A ship is safe in harbour, But it is not a place where it is meant to be!



मला आपल्या आतल्या निर्णयाने, ताकद मिळते ,पण हात पाय गळून जातात. खरेतर अशा वेळी मित्र, गुरु, सपोर्ट ग्रुप, असलेला चांगला असतो. माहितीतील ,ओळखीतील, माणसांहूनही अधिक मदत हे सपोर्ट ग्रुप मनापासून करतात. पंख पसरून, मागचे पाश तोडून ,पहिली भरारी मारताना, भीती वाटते व मदतीचा हात मिळाला तर बरे होईल, असे वाटते.  समजा दुर्दैवाने मदतीचा हात नाही मिळाला ,तरी आपणच आपल्याला मदत करायची, खुप खंबीर होण्याचा प्रयत्न करायचा. या नव्या भरारीत या संघर्षात यश मिळेल न मिळेल.success is  chance । पण आज मी हैराण झाले आहे.

कोणी विचारेल जेव्हा हरली कशी इथे मी!

तेव्हा जरूर सांगा ,लढले कशी इथे मी.

Please remember,all killed Jesica

## ९ पुढे काय होणार?

भारत इसवी सन २०२० साली ,कसे असेल देशाचे वर्तमान?, सध्याचा कालखंड हा जागतिक मंदीचा असल्यामुळे, सांस्कृतिक विकासासाठी तो सर्वश्रेष्ठ आहे. भारत हे जगाचे, आद्य सांस्कृतिक केंद्र असल्यामुळे ,२०२० पर्यंत आपला भारत देश, हा जगातील दुसऱ्या नंबरचा यशस्वी देश ठरेल. अमेरिका २०२० साली ही नंबर वनच राहील, नंबर १ मात्र आपण गाठू शकणार नाही. अर्थात, अमेरिकेतील ५०% हून अधिक लोकसंख्या ,२०२० साली भारतीयांचीच असेल.

मानव विकासात, आपला देश २०२० साली आघाडीवर येईल. देशातील राजकारणात ,विरोधी पक्ष दुर्बल होऊन, धाडसी निर्णय घेवून, लोकसंख्या नियंत्रणात आणण्यात, यश आल्यामुळे देशापुढचे प्रश्न सुटण्यास हरकत उरत नाही. परप्रांतीयांना ,त्यांच्याच राज्यात रोजगार व सन्मानाने जगण्याची संधी मिळाल्याने, मुंबई कडे वाढणारा लोंढा थांबेल.हे आडाखे आहेत

माणसा माणसामधील संवाद तुटला होता, तो घाई घाईच्या वृत्तीने व पैशाच्या अवाजवी महत्वाने तुटला होता. मात्र २०२० मध्ये, मनो मिलाफ व समेट वाढतील. पर्यावरणाचे प्रश्न, लोकसंख्या कमी झाल्याने अ◌ापोआप सुटतील. २०२० साली भारत महासत्ता होईल. ते मानवी जीवनाची उंची वाढवल्याने व मानवाचे जीवन व जन्म अनमोल ठरवल्यामुळेच होवु शकते.

नियंत्रित लोकसंख्येने, शिक्षण व रोजगार सहज उपलब्ध होईल. जल,वायू,भू,पशु, निसर्ग या संपत्तीचे संवर्धन करून, ग्लोबल वार्मिंग, कमी करण्यातही, भारताचा हात राहील.



आपापसातील संघर्ष वाढवून, वाद करून, कौटुंबिक भांडणे, लढण्या ऐवजी ,राजकारणी एकत्र येउन देशाच्या प्रगतीसाठी, प्रयत्न करतील .नवे, अधिक पूल बांधल्यांमुळे, जरा रोड ट्राफिक संयमित होईल ,तसे पु.ल. देशपांडेच्या शब्दांच्या सुसंवादी पुलांनी २०२० साली समाज सांस्कृतिक दृष्ट्या, नंबर वन होईल. माझ्या भारतीय असल्या बद्दल अभिमान अधिकच मोठा होईल .

देशाचा प्रगतिचा आलेख ऊंचावत आहे.

मेक ईन ईंडिया मुऴे तो २०२० मध्ये वृद्धिंगत होणार आहे.

बघू या.

# 10 पेन्सिलचे कच्चे टाचण

माझ्या एका मैत्रिणीचे वहीत, नेहमी पेन्सिलीचे टाचण असे. सुबक चांगल्या अक्षरात, अगदी पक्क्या टिपणा सारखेच, तिने ते लिहिलेले असे. माझे मात्र पक्के लिखाणसुद्धा ,खोडाखोडीचे, पांढऱ्या शाईने रंगवलेले असते? असे का? मनातल्या त्या कच्च्या टिपणाची भीती, माणसाला वाटते का? आपल्याला असेही काही वाटू शकते? आपण असे लिहू शकतो, हे इतरांना कळले तर ,कदाचीत लोक हसतील,ते टीका करतील. त्यापेक्षा "पेन्सिलचे कच्चे काम म्हणून, हे लिहिणे बरे" असे वाटत असावे.

कच्चे काम पुन्हा लिहिणे ,मला अगदी जीवावर येते. मूळ गाभा, तो गिचमिड असला, खोडा खोडीचा असला तरी, तो शेवटी ओरिजिनल असतो. त्याच्यात माझा टच असतो. पुनर्लीखाणात माझी मूलतः असलेली वैचारिक उर्जा बदलून जाते व मला पुनर्लीखाण केवळ हमालीच वाटते. माझे शब्दांचे भोळे, कोवळे भाव रूप मी, माझ्या लिखाणात लिहिते. मला वयानुसार खूप मौलिक विचारसुद्धा लिहिले नाहीत तर, नंतर ते आठवत नाहीत. त्यापेक्षा एकदम फ़ेअर लिहिलेले बरे! शिवाय ते कच्चे कागद, पुनर्लीखाणा पर्यंत हरवून जातात. लेखकाने टीका स्वीकारायची मनाची तयारी ,या क्षेत्रात उतरताच केलेली असते. अगदी टीकेची झोड असो, किंवा बोचरे टोमणे असो, ते सोसावेच लागतात. मग कच्चे लिखाण काय आणि पक्के काय? खूप जहाल लेख ,एकदा संपादकांनी “थोडा मवाळ करून द्या " असे सांगून मला परत दिला गेला. विषयाचे नाव होते

अर्धाची टाकुनी डाव जायचे अंती<br>ध्वज नाचत राहील कुणा कुणाच्या हाती



हा असा सुद्धा विषय, जर पुन्हा पुन्हा लिहून, पांचट, करायचा असेल तर, त्या लिखाणाचा उपयोग काय? आई मला लहानपणी सांगायची ,"नेहमी आपल्यापेक्षा, अधिक हुशार लोकांमध्ये वावर" त्यामुळे नम्रता येते व आत्मविश्वास हि येतो. कदाचीत त्यामुळेही असेल ,पेन्सिलने लिहावे, असे मला वाटलेच नाही.

तरीही मला वाटते, माझ्याही मनाच्या कोपऱ्यात, पेन्सिलने लिहिलेले, काही टाचण असेलच. तसे ते प्रत्येकाच्याच मनात असते किंवा असावे, असे वाटते. ते इतके कठोर, काटेरी असते कि ते पेन्सिलनेच लिहावे व खोडून टाकावे. सत्य हे खूप आश्चर्य कारक असते व ते उजेडाला जेव्हा घाबरते, तेव्हा ते पेन्सिलने लिहिले जात असावे.

हल्ली मीच, माझ्या मनात दडलेले, पेन्सिलने कच्चे टाचण चाचपत, घाबरत वाचते.

## 11 मन थकलेला संन्यासी(आजी)

मी ९० वर्षे वयाचे आजी आहे,जीवन यात्रेत सुखी आहे.माझे आयुष्याची नव्वदी जवळ आली आहे. मला अजूनही जगण्याची खूप उमेद आहे. आयुष्याचा रस ,मला अजूनही चाखायचा आहे. निर्मळ असा सत्संग व परमेश्वरी चिंतनातून मिळवणारा आनंद, मी अजूनही घेऊ इच्छिते. शरीर थकले तरीही, अजूनही कुठलाही आजार नाही. वयोमानाने येणारी कुठलीही दुखणी, फारशी आली नाहीत. जुन्या पिढीत चांगले तूप व ५ रु. किलो मिळणारा सुका मेवा ,बर्फी खाल्ल्याने व माझी जुनी हाडपेरं मजबूत होती, त्यामुळे मला नीट दिसते. ऐकूही येते. मृत्यू शय्येवर जेव्हा भीष्माचार्य निजले होते, तेव्हाही त्यांचा प्राण जात नव्हता. त्याचे कारण कदाचित, जीवनाचा मोह, हेच असावे. निष्क्रिय सज्जन म्हणून, मी देवधर्माकडे वळल्यावर, मला भीष्म मुनींची मानसिकता अधिक भावली व उमगली. गात्रे क्षीण होऊ लागल्यावर, त्या तिसऱ्या डोळयाने, पारमार्थिक आनंद समजतो. तरुणपणीचा काळ, चिडचिड, विचार, विकार, मानापमान, भावनांचे चढ उतार यातच जाते. पुरुषांचे वय तरी ऑफिसमधे,आरामातच संपते. बाईचे घरकामात संपते, बाईने नोकरी केली कि तर 'दोन्ही घरची पाहुणी उपाशी' असे हाल बाईचे होतात, माझे तसे नव्हते, मी सुखी होते.

वर्तमानपत्रातील श्रद्धांजलीच्या बातम्या वाचल्या, कि मृत व्यक्तीचे वय वाचायची सवय मला लागली. कोण किती वर्ष जगले , आपले अजून किती वर्ष जीवन असावे? पणतू - खापरपणतु झालेला बघायला, मी जगीन का? तरुण वयात गेलेल्या माणसांचे चूकांबद्दल, हळहळ व्यक्त करताना ,मला वाटते- किती काही करायचे राहिले यांचे? सर्व स्वप्ने अपूर्ण राहिली. अकाली आत्महत्या करणाऱ्यांबद्दल वाटते-



यांनी परमेश्वराचे चिंतन केले असते, तरीही यांचे जग बदलू शकत होते. मला अजूनही जीवनाची आसक्ती आहे, वाढत्या वयाबरोबर जीवनाची ओढ अधिक वाढत असावी.

भजनी मंडळाच्या, त्या आमच्या महिलांमध्ये ,मला खूप मान दिला जातो. माझे गुढगे दुखत नाहीत व मी पटकन उठते, बसते, म्हणून हेवा सुद्धा केला जातो. बाकीचे लोक आधारा,मदतीशिवाय, ऊठू शकत नाहीत.पैसा व तोंड यामुळे वादावादी होते. संबंध खराब होतात. याचा अनुभव मी तरुणपणी घेतले. खरे तर तरुण वयातील मी व आत्ताची मी यात खूप अंतर आहे. पूर्वी मी खूप चिडायचे. संताप करायचे. वाईट गोष्टी बघून मी विचार प्रवृत्त व्हायचे, निराश व्हायचे. काही गोष्टी ज्या इतर लोक विरोध "न" करता "जाऊ दे चालता हैं" म्हणत सोडून देत असत ,तिथे सुद्धा मी विरोध करीत असे.

"निष्क्रिय सज्जना पेक्षा सक्रिय सामान्य बरा" हा माझा ध्येयविचार होता. मी कष्टाला मागे नव्हते पण तोंडपूजी नव्हते. माझे विचार, त्या वेळी वेगळे होते. त्या लोकांमध्ये, खोटे खोटे गोड बोलून, मखलाशी करून, मी जगले असते तर, अधिक यशस्वी झाले असते. असे मला अजूनही वाटते. त्यावेळी मात्र विरोध पत्करूनही, मी विरोध केला! वाईट गोष्टींवर, चर्चा केली तरच त्यावर उपाय निघेल, असे मला त्या वयात वाटत असे. मात्र त्यामुळे मला चिखलाने माझे हात माखवून घेणे, भाग पडले. "रजनी" म्हणून दूरदर्शनवर जी सिरियल येई, त्यावरहुकुमाने, रजनी प्रमाणे मी वाद घालीत असे. ती सिरिअल होती, म्हणून ती रजनी जिंकते. प्रत्यक्षात साधेसुधे लढे जिंकणे सुद्धा मानवाला अवघड असते.

घरी मी सुखी आहे. मुले सुने नातवंडे मला मान देतात. मुले मला खूप मानतात. कौटुंबिक क्षेत्रात मला काहीही त्रास नाही. मात्र माझे जे सामाजिक कर्तव्याचे अंग आहे, ते मला स्वस्थ बसू देत नाही. बिनडोक लोक आयुष्यात खूप सुखी होतात. कारण त्यांना विचारांचा भुंगा, कुरतडत नाही. टीव्ही, सिनेमा, नाटके, कपडे,

दागिने, या फिलगुडच्या नशेमध्ये, हे लोक खुश राहतात. मला टीव्ही बघणे आवडत नाही. देशभरातील वीज टंचाईला दूरदर्शनचे संचच जबाबदार आहेत ,असे मला वाटते. दिवसातील २४ तासातील १२ तास, दूरदर्शन बंद ठेवावे. वाहिन्यांचे प्रक्षेपणच थांबवावे(हवा असला तर, रेडिअो ऐका) म्हणजे वीजबचत होईल व ग्लोबल वार्मिंगला दूर ठेवता येईल असे माझे प्रामाणिक मत आहे. माणसा माणसातील संबंध सुधारायला सुद्धा याने मदत होईल. पण लक्षात कोण घेतो. खर्या माणसांची किंमत नाही. मित्र कोण? फेसबुकचे चेहेरे! हल्ली घराघरांची थिएटर्स झालेली असतात, कुणाचा मेळ कुणाला नसतो. मुले पाळणाघरात, आई वडील वृद्धाश्रमात, व घरी सर्वजण आपापल्या विश्वात असतात. या समाजाचे वाईट वाटते. जुनाकाळ नेहमीच चांगला असतो, असे म्हणायची पद्धत असते. मी म्हणून म्हणते, असे नाही ,पण संस्कारासाठी त्या पद्धतीच, चांगल्या होता. पैसा पैसा,मौजमजा करीत आजच्या काळात माणूस कुठे जात आहे? पुढे प्रत्येक मन थकलेले संन्यासी व्हावे?

अनेक तडजोडी मी केल्या, त्यावरून मला माझ्या मैत्रीणीना संदेश द्यावासा वाटतो.

**ठेविले अनंते तैसेचि रहावे.**
**चित्ती असू द्यावे समाधान !**

अर्थात हे अवघड असते. मी हा देह जुन्या, जीर्ण वस्त्रा प्रमाणे त्यागून,मला नवीन देहाचे वस्त्र धारण करायचे आहे. मन थकलेला संन्यासी झाले आहे ,म्हणून पाटी कोरी करून ,नवीन सुरुवात करायची आहे. त्या नव्या श्रीगणेशाची मी वाट पाहते आहे. माझे हे मन थकलेले संन्यासी बनून, तीर्थस्थळाच्या मुक्कामाची वाट पाहते आहे.जगणे तरीही मोह पाडते,तरिही जावे तर लागणारच.(काल्पनिक)



# 12 ट्रोजन हॉर्स

वेरजीलच्या लॅटिन खंडकाव्यात, ट्रोजन हॉर्सचा  उल्लेख आहे. या कथेत मोठ्या लाकडी घोड्याच्या, पोकळ पोटात, ३० सैनिक दडून बसले होते. ग्रीक लोकांनी, पळून जाण्याचे नाटक केले व ट्रोजन लोकांनी, ग्रीकांनी बनवलेला, हा लाकडी घोडा ओढत ,आपल्या राजवाड्यामध्ये नेला. घोडा आत शत्रुगोटात गेल्यावर, अर्ध्या रात्री हे, आत बसलेले स्वार, बाहेर आले व त्यांनी किल्ल्याचे दरवाजे उघडले. बाहेरील ग्रीक सैन्याने, हल्ला करून, ट्रोम शहर जिंकले. सोनॉन नावाच्या ग्रीक सैनिकाची, हि कल्पना होती.प्रायम राजाची मुलगी राजकन्या, क्यासनड्रा सांगत होती, कि हा लाकडी घोडा ,आपल्या राज्याचा नाश करेल. पण तिच्या बोलण्याकडे, इतरांनी दुर्लक्ष केले. काही इतिहास तज्ञांच्या मते, एका बोटीमध्ये शांतीचे प्रतिक ,म्हणून हा लाकडी घोडा, बक्षिस म्हणून पाठवला गेला. हे मात्र खरे की, ओडिसीअसच्या  लाकडी घोड्याने, ग्रीकला विजय मिळवून दिला.

इस्तंबूल येथील ,पुरातन विभागाच्या संग्रहालयात, जर्मनीतील शिलमान म्युझियम मध्ये, स्टूटगार्टच्या (जर्मनी) म्युझियम मध्ये, ट्रोजन हॉर्सच्या प्रतिकृती बघता येतात. लाकडी खेळणी घोडा, हा इतका घातक कसा ठरू शकतो, त्याचे ट्रोजन हॉर्स हे उदाहरण आहे.संगणकातील एक व्हायरसला सुद्धा, ट्रोजन हॉर्स नाव आहे. हा ट्रोजन, सॉफ्ट वेअर मध्ये इनस्टोलेशनच्या वेळी घुसतो व माहिती चोरतो किंवा संगणक बंद पाडतो. साईट ह्याक सुद्धा करू शकतो. साधे अप्लिकेशन म्हणून शिरून, सिस्टम डीस्ट्रॉय करतो.मराठी लोकांमध्ये चकवा, हि संकल्पना अस्तित्वात आहे. अंधाऱ्या रात्री, वाटसरूला जंगलात सहप्रवासी भेटतो. तो आपल्या जवळच्या माणसा सारखा आवाज काढून, बोलून ओळख वाढवून, भुलवतो व आपण त्याच्या अधीन होऊन वाट

चुकतो. त्यावरूनच ‘चकवा झाला’ हि म्हण अस्तित्वात आली. तशीच ट्रोजन हॉर्स हा व्हायरस, ही कल्पना कार्पोरेट जगतात तयार झाली आहे.

दहा वर्षाचे ग्रीक राजांमधील, अगामेमनॉन व ट्रोजन प्रायम, मधील युद्ध शेवटा पर्यंत नेण्यात, ट्रोजन हॉर्सच्या युद्धनीतीचा उपयोग झाला. ट्राय शहरात प्रवेश करण्यासाठी, ग्रीन सैनिकांनी, एक मोठा लाकडी घोडा आणला होता. त्या घोड्याच्या पोटात ,मोठी लाकडी पोकळ पेटी होती. ज्यात सैनिक लपून बसले होते. हा घोडा शत्रू पक्षाला भेट दिला गेला. रात्री या घोडयाच्या पोटातील सैनिकांनी, बाहेर पडून ,शत्रूचा खातमा केला.एखादी व्यक्ती किंवा एखादी व्यक्ती ,जी शत्रूला रसातलात नेण्यासाठी त्या शत्रू गोटात पेरली जाते, तीला ट्रोजन हॉर्स (स्पाय)म्हणतात. डाऊन फ़ॉल ऑफ एनिमी बाय ट्रोजन हॉर्स ,अशी युद्ध नीती कार्पोरेट जगतात सुद्धा वापरली जाते. एखाद्या युद्धात लढणाऱ्या सैनिकांना, ट्रोजन हॉर्स वापरावा लागतो.

‘एव्हरी थिंग इज फ़ेअर इन लव्ह एन्ड वॉर’ .

अनुभवलेले कुठलेही संकट वाया जात नाही, ते काहीतरी शिकवून जाते. दिवस उलटतात ,मात्र काही वर्षांनी वैभव संपन्न करतात. अनुभवातून जो विद्यार्थी शिकतो ,तोच जर ते शिक्षण ,तो जीवनात वापरू शकला तर, यश, त्याला मिळते. अर्थात एक शोधावे तर, दुसरेच काही मिळू शकते. पोटातून शत्रुत्व,भरून आलेला ट्रोजन हॉर्स ,बक्षिसांच्या रुपात गिफ्ट म्हणून मित्र म्हणून, आपल्या राजवाड्यात अंतर्गृहात हजर होतो. भ्रष्टाचार,लाच घरात अशीच येते.पैसा कुणाला नको असतो,त्याच्या त्या उजव्या ,छान ,रूपाचे देखण्या छनछन व्यक्तिमत्वाचे आपल्याला कौतुक वाटते. त्याच्या रूपाने, मैत्रीच्या बुरख्यात येणारा शत्रू ,सामान्यतः ,साध्या माणसाच्या लक्षात ,चटकन येत नाही.

माणूस माफी करून, आपण मनाचा मोठेपणा दाखवतो कि भ्याडपणा? एकाची ठेच दुसऱ्याला शहाणी करते व त्यातूनच युद्धनीती तयार होते. अनुभव हा उत्कृष्ट



शिक्षक असतो. पण त्याचा काळ व फी फार जास्ती असते. विश्वास देखील शेवटी, विश्वासघाताने, पानिपतचे युद्धात मारला गेला,तो कपटाने रणांगणा मध्ये मेला, असे म्हणायची वेळ येते,

खूप एकजुटीने आपण युद्धनीती रचतो, मात्र हरतो.

आपल्या समूहातील भरवशाची ,व्यक्तीच ट्रोजन हॉर्स असते.

आपले शब्द ,विचार ,योजना तिच्या पोटातूनच, कचासारखे शत्रू गोटात जातात.

शत्रू जिंकतो व आपण म्हणतो "दोस्त दोस्त ना रहा.

ट्रोजन होर्स यालाच म्हणतात

# 13 नावा पुरते

फॉर नेम सेक - म्हणजे नावापुरते असणे. म्हणजे अस्तिव असते पण ते दखलपात्र नसते. तरीही ते अदखलपात्र असलेले, पात्र भ्रमयुक्ततेत राहते ,कि मी कुणीतरी आहे. खरेतर या विशाल अशा जगाच्या पसार्यात, असुरक्षित वातावरणात, आपण सर्वचजण नेमसेक साठीच उरतो. केवळ नावा पुरते, नामधारी! प्रत्येकालाच स्वप्न असते. "कुणी खास व्हावे" पण ते जमतेच असे नाही आणि मग ते नाममात्र,अल्प सुख जे नशिबी येते ते गोड मानून घ्यावेच लागते. नेमसेक शब्दच आपल्याला शिकवतो कि

"अर्धेच टाकुनी डाव जायचे अंती, ध्वज नाचत राहील कुणा कुणाच्या हाती !

आयुष्यात काय काय हवे, हि यादी साधारणपणे,प्रत्येकाच्याच मनात तयार असते. जे हवे त्यात "चारचौघांत नावलौकिक व्हावा" हे एक नंबरला असते. नाही तरी मनात, पैसा हवा हे कुठेतरी असते. जगातील बर्याच गोष्टी, या नेमसेक म्हणजे नावापुरत्याच ,नाव कमवण्या पुरत्याच असतात. नातेसंबधामधील वीण त्यात नसते, किंवा असतेच असे नाही. कल्पनेतील त्या अप्रत्यक्ष सुखासाठी, काहीतरी करणे ,त्यात क्रिएटिव्ह किंवा वास्तव दाखवता येईल, असे काही नसते. तरीही त्या नेमसेकने फिलगुड मिळते. नेमसेक म्हणजे नावासाठी, फक्त नावा करिता होय. निसर्गचक्रात प्रत्येक सजीव, पुनरुत्पादन करून, आपल्या स्पेसिजचा जीव, जन्माला घालतो. ते सुद्धा नेमसेकसाठीच! जंगलातील कीटक, पाण्यातील जलचर व मानव व असल्यास परग्रहावरील सजीव सर्वांमध्येच हि नेमसेकची भावना असते. निसर्ग नवलाई एवढीच, नेमसेकची अंतर्भावना "बेसिक इनस्टीक्ट मुलभुत आहे.प्रतिकूल परिस्थितीत सुद्धा, नेमसेक बाबत, स्वतंत्र विचार कुणाला झेपत नाहीत. नातेसंबंध बिघडू नये व प्रश्न



सामोपचाराने सोडवावे या भावनेत सुद्धा नेमसेक येतो. तर युद्ध करून दुसऱ्याला संपवणे यात सुद्धा नेमसेक असतो.

जगण्याचा, उन्हाळाच्या दिवसात मौजमजा करण्याचा, एखादाच दिवस "माझा असतो" बाकी सगळे दिवस नेमसेक साठी, मन मारूनच काढावे लागतात. खरे तर आपल्याला ओळखणारी फार थोडीशीच माणसे असतात. मात्र आपण "त्यांच्या समोर आपले नाव खराब होईल ते काय म्हणतील?" हि भावना घेऊन वावरतो. नेमसेकमुळे ,हि काल्पनिक भीती व त्या भीतीचा न्यूनगंड व त्या अनामिक टीकेची काळजी आपल्याला सतत विळखा घालून राहते. म्हणूनच तर म्हटले जाते-

"ईक दिन मिट जायेगा माटीके मोल,

जग में रह जायेंगे प्यारे तेरे बोल "

किंवा

"दुनिया में तुम्हारा नाम रहेगा!"फॉर नेम सेक

तुका म्हणे उरलो मी नावापुरता!

फॉर नेम सेक

# 14 कल्पना

आपण म्हणतो ,शब्द म्हणजे वारा

कल्पना म्हणजे, जिला नसतो थारा!

मात्र एक कल्पना काय करू शकत नाही?

तुमचे अवघे जीवन बदलून टाकते.

एखाद्या व्यक्तीला भेट देण्यासाठी सुद्धा सर्वोत्तम भेट म्हणजे नवी कल्पना होय. अर्थात या नवीन कल्पना ,या जुन्या कल्पनांच्या शत्रू हि असू शकतात किंवा त्या नवीन नवकल्पनेचा पायाही ठरू शकतात.

साध्या वृत्तीचे लोक माणसांची चर्चा करतात.

मध्यम वृत्तीचे लोक घटनांची चर्चा करतात.

उत्कृष्ठ वृत्तीचे लोक कल्पनांची चर्चा करतात.

अर्थात कल्पना घातकही असते, जर ती तुमच्या विवेकाचा सुद्धा ताबा घेऊ लागली तर! त्यामुळे या उत्कृष्ठ कल्पनेला, प्रयत्नांची जोड देऊन, काहीतरी मिळविण्यासाठी, पुढे व्हा. नुसती कल्पना फोल व दुबळी ठरते, जर तिला उर्जा, प्रयत्न व मनुष्यबळ मिळाले नाही तर!कल्पनेचा सत्या पर्यंतचा प्रवास सोपा नसतो. प्रत्येक वळणावर कष्ट असतात. झपाटल्या प्रमाणे ती कल्पना,आपल्याला सतावत राहते. सांगता येत नाही आणि सहन हि होत नाही. पण हरवलेले यश ,शोधायला हि कल्पनाच बळ देते.

प्रत्यक्षाहूनहि कल्पना सुंदर म्हणतात, कारण वास्तवातील जिव्हारी लागणारे घाव व रंगहीन अडथळे तिच्यात नसतात. कल्पनाच माणसाला बळ देते. कल्पवृक्ष, कल्पकता, अकल्पिता या सर्वच शब्दांचा उगम, कल्पना शब्दांपासूनच झाला आहे.



अक्कल, कलाकार या मध्ये सुद्धा कल्पनेचा अंश असतो. कल्पना करा कि मनासारख्या कल्पनाच जर सुचल्या नाहीतर ? जग निराश होईल, प्रगती थांबून जाईल. कलाकारांची प्रतिभा करपेल,तर ती भयानक असेल. कल्पनाच करता येत नाही कि काय घडेल! थोडक्यात काय कल्पना आहेत, म्हणून जग पुढे जात आहे.

दौलत से नही साँसोसे नही
कल्पनासे चलती हैं दुनिया !

ये किस कवी कि कल्पना का चमत्कार हैं, असे निसर्गाचे हि वर्णन केले जाते. म्हणजे थोडक्यात काय- पृथ्वी हि सुद्धा जगनियंत्या, देवाची कल्पनाच आहे! साकार व्हायच्या मार्गाने मार्गक्रमण करणारी कल्पना श्रेष्ठ असते. प्रतिकूल परिस्थितीत कल्पनाच माणसाला पुढे नेते. भविष्याच्या नव्या कल्पनेकडे नेते

# 15 जीवाची मुंबई

मुंबई बद्दल आकर्षण, प्रत्येक व्यक्तीच्या मनात असते. पूर्वी लहानपणी मला मुंबई च्या रस्त्यावर हिरो- हिरॉइन्स व चित्रतारका सहज दिसत असाव्यात असे वाटत असे. माझी मामे बहिण कॅन्सरने आजारी असताना, ती आता जास्त जगणार नाही,असे कळल्यावर "मला मरण्यापूर्वी एकदातरी मुंबई बघायची आहे" म्हणून रडत असे. हे जग सोडून जायचे ,हे माहित असतानाही मुंबईचे आकर्षण तिला बोलावत होते.

'दाजीबा मुंबई बघायची' असे ती गात असे.

"कहीं बिल्डींग कही ट्रामे ,कही मोटर कहीं मिल

मिलता हैं यहा सबकुछ ,इक मिलता नाही दिल

इन्सानका नही कोई नमो निशान |

ये है बंबई मेरि जान"

अशा रीतीने हे शहर ,उपनगरांचे पाय पसरत होते. सेंटीपेडच्या,अळीचे पायां प्रमाणे (पाय)अनेक दिशांनी पाय पसरून, हे शहर अस्ताव्यस्त, अवाढव्य व हिडीस सुद्धा बनू लागले. शोभा डे नी म्हटले आहे-

'मुंबई हि शोषण झालेली नृत्यांगना आहे जी दलालांच्या हातातील बाहुले, खेळणे बनली आहे. येणारे लोंढे, तिच्यावर ताण आणत आहेत. जोपर्यंत ती सहजसाध्य नव्हती. तोपर्यंतच ती सुंदर होती. जसजशी ती चाळी, झोपड्या, अनधिकृत बांधकामे ,या मुळे स्वस्त व सामान्यांच्या आवाक्यातील बनली व तिचे सौदर्य ओसरले. पूर्वी भारतातील ५ मेट्रो शहरांमध्ये ,मुंबईचा नंबर वरचा होता व भारतातील उत्तमोत्तम शहरांत, ती दहाव्या नंबरवर होती. आता अंतर्गत सुविधांवरील ताणामुळे व अवाढव्य



जनसंख्ये मुळे, ती एकविसाव्या नंबरवर गेली आहे. चित्रपट सृष्टी, शेअर बाजार, व्यापाराचे शहर, ग्लॅमर यामुळे मुंबई "सिटी देट नेव्हर स्लीप " अशीच बनली आहे. मात्र त्याचवेळी मुंबईत, सुंदर समुद्र किनारी एक एक करीत, अनधिकृत झोपड्यांची मालिका वाढत होती आणि आहे. प्रत्यक्ष अशा श्रीमंती- गरिबी, प्रगती व अप्रगतता, परस्पर विरोधी गोष्टी एकाचवेळी वाढत होत्या.'

"सीनेमें जलन सासोमें तुफानसा क्यू हैं ?"

अशी अस्वस्थता असूनही, हात पसरून सर्वांना ,सामावून,पाहुणचार करून, आज २०१६ ला मुंबई कंगाल झाली. मुंबईचा नंबर, पुणे ,बंगलोर ,म्हैसूर ,मिरट, ,दिल्ली, हैद्राबाद यांच्याहि पुढे पार खाली घसरला आहे. 'बिटवीन लाईन' मुंबईत फारच खाडाखोड व गिचमिड झाली आहे.

मुंबई नगरी बडी बाका, जशी रावणाची दुसरी लंका.

गाजतो डंका,

डंका चहु मुलखी<br>
राहायला गुलाबाची फुलकी<br>
पहायली मुंबई बडी बाकी.

योजना नसलेली, घाणीचे साम्राज्य बनलेली, प्रदूषणाने भरलेली हि मुंबई आता हताश झाली आहे.हताश अशा वृद्ध व दुःखी ऋषी प्रमाणे, जे घडते आहे, ते मुंबई बघते आहे. तिला आवाज उरला नाही. व्यक्तिमत्व उरले नाही आणि स्वप्ने तर तिने कधीच, समुद्रात अर्पण केली आहे. झोपडपट्टीतील असो किंवा टॉवर मधील असो, सारेच लोक कंटाळले आहेत.पाण्याच्या समस्येने पिडले गेले आहेत.

जुहु बीच वर अतिक्रमण झाले.<br>
समुद्राच्या पोटात दगड व खडक भरले.<br>
सुंदर बंगल्यांच्या जागी टॉवर आले.

टेकड्या कधीच भुइसपाट झाल्या

रस्त्याचे फुटपाथ चोरीला गेले,

उद्यानांचे बनले भिकारी अड्डे

दर लोकलने इथे परदेशी आले

मराठी माणूसपण पर हरवले

आमची मुंबई आमची जाते कुठे?

मुंबई स्पिरीट कधीतरीच येते

"ऑल इज वेल" म्हणून काय होते

सत्यावर एक चादर पसरते

खोट्या फिलगुडची नशा चढते

मुंबई मूकपणे अश्रू ढाळते.

तिच्या अश्रुने समुद्र खारा होतो

समुद्रावर नवा सी लिंक उभा राहतो

जर समुद्राने मुंबईला पोटात घेतले.

तर कुठे जातील हे विकाऊ इमले ?

हो अशी हि जीवाची मुंबई

आहे माझी सखी माझी आई

जीवाची मुंबई करून घ्या

ह्या सुट्टीत मुंबई बघून घ्या!

मुंबई उंचावरील मलबारहिल इंद्रपुरी

कुबेराची वस्ती तिथे सुख पाणी भरती

परळात राहणारे ,रात्रंदिवस राबती

मिळेल ते खाऊनिया, घाम गाळती



## 16 देव निदान देवळात असावा!

देव नक्की कुठे असतो?

माणसे देवा घरी जातात म्हणजे नक्की कुठे जातात?

लाडक्या माणसाच्या मृत्यनंतर, त्या व्यक्ती संबंधित नात्याचा सुद्धा, मृत्यू का व्हावा? माणूस गेल्याचे दुःख असते, त्यात इतर नातेवाईक बदलले व आपल्याला टोचा मारू लागले, आपल्याला एकटे पाडून ,तंटा करू लागले, हेही दुःख होतेच. माणसांची नाती नेहमीच सुखनिष्ठ असतात. तोरण दाराला, झुंडीने येणारी माणसे, लग्नात जेवायला येतात. मात्र मरण दारी येणे टाळतात. माणसे आनंदोत्सवाला जमतात, संकटकाळी पळ काढतात.प्रश्न निर्माण झाला कि

फ्रेंड इन नीड इज फ्रेंड इन डिड.

म्हणण्याचा काळ गेला आता म्हणतात
फ्रेंड इन नीड इज नॉट नाऊ माय फ्रेंड

स्वागता साठी माझ्या  थुंकले मुखाने

थुंकले तोंडावरी, तो माझा सत्कार होता

अंत्य यात्रेला माझ्या, गर्दी बरीच जमली

ज्यांनी खांदा दिला ते ,माझे खुनीच होते.

दुसऱ्याला त्रास देऊन ,आपण त्रास देण्यात ,यशस्वी झालो, असा जल्लोष करणारे, या जगात थाटात राहतात. देवाच्या दारी, विनारांगा आत शिरतात. मात्र खरा भक्त हा दाराच्या बाहेर उन्हाने तळमळतो. "देव देवळात नाही" हे कानी कपाळी ओरडूनही,वाटते , कुठेतरी तरी तो देव असेल, निदान देवळात तरी असावा."

देवाकडे कुठलीही सिनीओरिटी लिस्ट नसते ,कि पर्फोर्मंस ॲनालिसिस नसते. "त्याची मर्जी " त्या मर्जीला, कुणीही कधीही चॅलेंज करू शकत नाही. एखाद्या व्यक्तीच्या मागे देव आणि दैव हात धुवून मागे लागते. देव ही एक न्याय करणारी, उच्च स्तरीय शक्ती ,मानली तर ती कुठे असावी? कलियुगातील सामाजिक वातावरणात ,ती कुठेतरी असावी, असे वाटत तरी नाही. रस्त्यावर, घरात, ऑफिस मध्ये कुठेही सद्गृहस्थ व सत्शील स्त्री सुरक्षित नाही. देव सर्वत्र असतो, म्हणतात, पण मला वाटते, देव पृथ्वी वरून, परग्रहावरच वस्तीला राहायला गेला असावा.

मी देवाकडे माझी तक्रार मांडण्यासाठी<br>
मागणी करण्यासाठी खोळंबले आहे,<br>
त्या देवाला शोधते आहे.<br>
अरे देवा ,निदान देवळात तरी तू असावास<br>
अशी माझी भाबडी आशा,अपेक्षा आहे



# 17 मी का हरले?

भ्रष्टाचाराच्या विरुद्ध लढाईत, जिंकणे सोपे नसते. ती एक साखळी असते. मी हरले हे मी मान्य करते. मी स्त्री एकटी व एकाकी या स्वार्थी लबाड दुनियेत, लढू शकत नाही. ऑफिस मधला त्रास, हा अन ऑफिशिअल असतो. घरी विवाहित स्त्रीचा छळ होत असेल ,तर ४९८ अ कलम लावता येते. मात्र ऑफिस मध्ये तसे करता येत नाही. पगाराच्या चार नोटा हातात घेवून,नोकरी टिकवून, बाई एक असुरक्षितता विकत घेते. तोंड दाबून बुक्क्यांचा मार असतो तो. कितीही काम करा, तिला श्रेय मिळत नाही. लहानपणी गणिते शिकवली जायची. एका हौदात चार तोट्यानी, वेगाने पाणी पडते, दोन तोट्यानी (नळानी) गळून जाते .तसे झालेले असते. हा गळका हौद कधीच भरणे, शक्य नसते. कार्यालयात ,जुन्या मॅनेजरने, घाण कामे करून,बेशिस्ती वाढवून ठेवलेली असते व ती निस्तरायला नवीन मॅनेजरला,ती महीला असली तरीही, हात घाणीत घालावे लागतात. जुन्या चुकीच्या गोष्टींची घाण माझ्यावर पडली, वाटले,जुन्या घाणीची भीती नवीन आलेल्या व्यक्तीला असते. स्त्रीला असते. बाकी ज्यांना दलदल घाणीत, डुकरा सारखे लोळायला आवडते व ते घाण करून त्यातही कमाईची संधी मिळवतात.ते काहीजण जे होते ,त्यांच्याशी मी लढू शकले नाही.

उलट जुनी माणसेही, तक्रारकर्त्यांना फितवत राहतात. तक्रारपेटीशीच माझे पोस्टिंग होते. माझ्या सोबत काम करणाऱ्यांना, माझ्या प्रश्नाशी काहीही देणे घेणे नव्हते. स्वतःचा पगार, लवकर जाता येणे, वेळ काढणे, वेळ घालवणे यातच ते खुश होते. माझ्या लढाईशी त्यांचा संबंध नव्हता, असे ते समजत होते. काहीजणांचे तर,

त्या घाणीच्या साम्राज्याशी ,साटे लोटे होते. कट प्रॅक्टिस पेर्सेनटेज प्लान, बेनिफ़िशन ॲरेंजमेंट, अशा शब्दात अयोग्य गोष्टीही , सामान्य लोक सुद्धा, दुर्लक्षित करीत होते.

ती त्यांची ॲप्येथि होती व त्यात त्यांचा स्वार्थ होता. इतरांचे प्रश्नात पडू नये, म्हणून ते लोक आपापल्या नशेत वावरत होते आणि बघून न बघितल्या सारखे करीत होते, आणि हो अशा विचित्र व्यक्तींशी सलगीने सुद्धा वागत होते. तो त्यांचा स्वार्थ होता व आपले नाव या तक्रारकर्त्याने घेऊ नये ,अशी सोय होती. मी उपाशी लढत असताना, बाकीचे लोक चहात बिस्कीट बुडवून, शांतपणे खात होते. इतरांची घाण निस्तरताना माझे नाव, मात्र बदनाम झाले. माझे मात्र हात काळे झाले, माझा अभिमन्यु झाला. हो मी एवढे लिहिले, बाकीचे काही लिहिले नाही ना?"नसलेल्या स्टॉक्सं" च्या वर दहा लाख कर्ज मागणाऱ्या, एका तथाकथितला मी कर्ज दिले नाही ,म्हणून तो मला त्रास देत होता.

हरायला कारण लागत नसते.



# 18 एक दिवस छळाचा

कदाचित काही जणींना वाटेल, एका दिवसाच्या छळाचे काय विशेष? आमचा संपूर्ण जन्मच छळाचा अाहे! घराबाहेर स्त्री सुरक्षित नाही, म्हणून हे छळ सोसावे लागतात. त्यात कुणालाही माझी किंमत नाही, मी राब राब राबते, पण कुणी कदर करीत नाही. या तक्रारी पासून अति श्रीमंतांच्या असतात त्या ,माझा मुळी वेळच जात नाही. मला करमत नाही ,अशा इतरही, कुठल्या तक्रारि असू शकतात.

'बंद दरवाजा' या अमृता प्रीतमच्या गोष्टीत, एक रात्र घराबाहेर राहिलेल्या, स्त्रीची गोष्ट असते, तर बेबीज डे आऊट" मध्ये घर हरवून, बाहेर गेलेय बाळाची आहे! असा एखादा वेगळा दिवस, आयुष्यात येतो. काही दिवस कसे स्वयंप्रकाशी, उत्सवी असतात, तर काही गूढ हळवे, उदास, बनवतात. छळाच्या दिवसात सुद्धा वेदनेत, हुंदक्यात दर्द असून, कला उमलू शकते. कधी स्वप्नांचा सतत मोहोर असतो. कधी कळयांनी उमलावे असे, तर कधी मन, कळत नकळत छळते, असा छळ असतो. माणसाचे लहरी मूड, मनाचे रंग, चंद्राच्या कलांशी निगडीत आहेत म्हणतात. पण चंद्राला सुद्धा, काही गोष्टी कळणार नाहीत, इतका प्रत्येक दिवस वेगऴा,निराऴा ,काळा पिवळा असतो. कधी वाटते " बडी बेवजह जिंदगी जा रही हैं" तर कधी वाटते "सौ बरसकि जिंदगी से अच्छे हैं प्यार के दो चार दिन" आम्र कुसुमे ,चंद्र चांदणी पेक्षा, हा छळाचा दिवस वेगळा असतो. साध्या साध्या गोष्टीत राग येतो.उदा. दुध नसणे, चप्पल तुटणे, भांडण होणे, चोरी होणे, पडणे, कापणे,भाजणे असे होते. सर्वत्र निराशामय वातावरण असते.

आरशात सुद्धा शत्रूचे तोंड दिसावे ,असा दिवस खराब जातो.

एखाद्या दिवशी काहीच मनासारखे होत नाही.

सकाळी उठून कुणाचा चेहरा पहिला देव जाणे ,

असे म्हणून चडफडत आपण सहन करायचे.

असा अनुत्साही छळाचा दिवस आला तर काय करावे?

मित्र मैत्रिणींच्या घरी जावे,

एखाद्या देवळात जाऊन स्वस्थ बसावे.

रोज रोज दिवाळी कशी असणार?

कधी तरी चार वर्षांनी, २९ फेब्रुवारी येतोच.

तसा, त्यावेळी तो एक दिवस छळाचा समजायचा! अमृता प्रीतम म्हणतात,

"इन्सान महिने के उनतीस दिनोको खुशिसे लांघ जा सकता हैं ,

मगर, हर महिने तिसावा दिन जरूर आता हैं ,जो रुला देता है"



## 19 प्रकाशाचे कवडसे

काही जणंाचे जीवन ,एक सुखी, नीटस , अखंड विणलेला शेला असते त्याला ,महावस्त्र म्हणतात, मात्र गोर गरिबांचे जीवन, कशीतरी शिवलेली, खूप लहान तुकड्या तुकड्यांनी जोडलेली, घोंगडी, रंग बिरंगी कागदी कपट्यांचे बनलेले, कोलाज असते. तसे हल्ली आपले आयुष्य झाले आहे. एक सुरी धागा असा कुठेच नाही. खूप ओळखी असतात, म्हणजे परिचित, स्नेही असतात. ओर्कुट वर "फ्रेंड्स सर्कल" असते. जेवायला, पार्टीला, एकत्र येणारे सहभोजनकार असतात. "यु लुक ग्रेट टुडे" सांगणारे सुकथनकार असतात. पण तरीही कुठेतरी, मन भरलेले वाटत नाही. मनाचा एखादा कोपरा, रिकामाच राहतो. खूप दिशांनी प्रकाश टाकावा आणि तरीही एखाद्या कोपऱ्यात, अंधार दबा धरून बसावा, तसे माझ्या मनात हल्ली एकाकीपण असते. खरेतर माणूस जेवढ्या वरच्या पदावर जातो,तो अधिक एकाकी होतो.

वाटते,नाते संबंधांची गोधडी शिवलि आहे. वेळेचे काटेकोर नियोजन करूनही, फावला वेळ मिळू नये व वेळापत्रक बिघडावे, असेच वाटते आहे. वेळ मिळत नाही, अर्धे कार्यक्रम वेळेअभावी, अर्धेच टाकून यावे लागते. बरेच दिवस नेट उघडून, मेल चेक केले नाही. अभ्यास करायला पुस्तके संदर्भग्रंथ आणले आहेत, पण वेळ नाही. या सर्व पॅक शेड्युललाच ,मी गोधडी म्हणते आहे! अगदी जुन्या काळाच्या ,आजीच्या भाषेत सांगायचे तर "एक ना धड, भराभर चिंध्या! " दुसर्यांच्या नजरेतील भाव भावना, विचार, अनादर, स्वार्थ कळण्या एवढे आपण प्रगल्भ झालो, कि अधिक एकाकी होतो.

एखादी चतुर व्यक्ती एखाद्या रस्त्यावरून चालते तेव्हा तो पथ असतो. मात्र अनेक व्यक्ती त्याच रस्त्याने जाऊन पंथ बनवतात. हल्ली अध्यात्माचे असे पंथ बनत

आहेत. मात्र त्याच व्यक्तींच्या आत एक दुसरी व्यक्ती असते, जबाबदारी टाळून, मौज मजा, विश्रांती, हवी म्हणून, ती अध्यात्माला जवळ घेते. बायपोलर व्यक्तींना नक्की काय हवे असते? मूलतः आपण बायपोलर झालो आहोत, हेच त्या मान्य करीत नाहीत. हे सत्य हे कटू आहे व नकारात्मक टीका करणारे हे सत्य स्विकारले जात नाही व टीका करणाऱ्याला, बरे वाटले तरी तेही दुःख असतेच.आई वडिलांचे एवढी, एकटाकी माया कुठेच नसते.

या अंधार काळात , मला लिखाणाच्या अनेक ऑफर्स आल्या आहेत. रंगीबेरंगी, नवी दुनिया, गोष्टी वेल्हाळ असे तीन माझे लेखमालांचे संग्रह पडून आहेत. पण फार नकारात्मक लिहिते, म्हणून मला नकार मिळाला आहे. पण मी लिहित राहिले. कदाचित प्रकाशाचा कवडसा, मला कुठेतरी क्षितिजावर दिसत होता. माझ्या सारख्या, काही वेगळयांना माझे ते लेख आवडतील ही आशा ,हा प्रकाशाचा कवडसा आहे.

प्रत्येकाने तो कवडसा जपून ठेवावा.

सदा देखावा प्रकाश, देखू नये अंधकार

मग हसतच होतो सुख दुखांचा स्वीकार.



## 20 फाटलेली धरणी

खिल्लारीच्या भूकंपाचे वेळी, मी फाटलेली धरणी, बघितली होती.आक्रोश बघितला होता.अचानक आलेले संकट बघितले होते.नोकरीत एका कर्जदारामुळे आलेले संकट, मला तसाच भूकंपाचा अनुभव देवून गेले.

शेती,नोकरी-चाकरी कशी असते? भूतकाळ कसा असतो?काही क्षणांच्या सुखद आठवणीवर माणूस आयुष्य काढतो,मात्र संकटानंतर जीवनाची चवच जाते.बिरहा नंतर, त्या प्रियेची सावलीसुद्धा प्रियकर लपवतो. खरेतर किती लबाड असतात काही लोक? ते आपल्यालाच का भेटतात? माझी मैत्रिण सहचरी, ती माझ्या गाडीतून यायची, पण उन लागते म्हणून, चांगल्या बाजूला बसायची,तिचे घराचे दारापर्यंत, गाडीने सोडायला लावायची. इतकी सर्व्हिस घेऊनही "पूर्वीचा मॅनेजर मला तीन वाजता घरी जाऊ देत होते." म्हणून मलाच ,टोमणे मारायची. बायकांचे -बायकांशी पटणे अवघड असतेच! त्यात अशा लबाड असल्यावर काय विचारता? ती सारखी जुन्या मॅनेजारची स्तुती करते, हे मला खटकते? कि ती माझ्या विरुद्ध तक्रार करणाऱ्या एका दुसऱ्या ग्राहकाला नेहमी भाव देते, हे खटकते? ज्या माणसाने माझ्या विरुद्ध तक्रार केली ,त्याला हिने का बढावा द्यावा? त्याने हिच्या विरुद्ध काही तक्रार करू नये म्हणून? कि हि सुद्धा श्री **प्रमाणे काही पर्सेन्टेज घेत होती? थर्ड बिझनेस चा ,वाटा ,शेअर बंद झाला म्हणून, तिला माझा राग येत असेल का?

माझी सहचरी हुषार ,पण तिला कुठलेच काम करायचे नसते, पण भाव ती असा आणायची कि विचारू नका. तिला रिलिव्हर येई पर्यंत मला सोडता येत नाही. मला सुद्धा शारीरिक बळ नाही कि मनुष्य बळ नाही.रोज प्रार्थना करायची-

इतनी शक्ती हमे देना दाता, मन का विश्वास कमजोर होना|

जगात,गुरु,सक्रिय सज्जन उद्बोधन करतात. समाज जागृत करतात. पण इथे सज्जन कोण आहे? सगळयांचेच स्वभाव विचित्र वाटतात. अंगावर येणारे, कधी गुपचूप, सुरा खुपसणारे, डिप्लोम्याटिक! कधी गोड बोलतील, कधी खेकसतील, कधी डंख मारतील, मतलबासाठी कुणालाही खड्ड्यात घालतील आणि इतरांचे प्रश्न म्हणून दुर्लक्षित करतील. लबाड ढोंगी, पण देव माणसाचा आव आणून वावरणारे जगी असतात. दुनियादारी मला कधी कळलीच नाही. मी माझ्या चांगुलपणाच्या चष्म्यातून, जग बघत राहिले. लोलकातील वेगळी किरणे मला कळलीच नाही. मी कर्ज मंजूर करायला नाही म्हणते. खाते उघडायला नाही म्हणते.बाई ऑपरेशनचे काम देते. मग मी डीपॉझीट कसे वाढवणार?व लोन कुठून देणार ?टार्गेट कसे करणार?

अशा तक्रारी माझ्याबद्दल झाल्या.शिवाय काहींच्या मायावी भाषेला, सगळे भुलतात फसतात. नोकरीत मी माणसांना, कधी ओळखूच शकले नाही.जग पैशाचेच भुकेले असते. स्वार्थ माणसाला अगदी खालच्या थराला नेतो. संवाद कसा साधायचा? त्यात तब्बेत कशी सांभाळायची, संकटात, शांत कसे राहायचे? मला समजेच ना? नीलमोहोर, यौवनाचे फुल,गार हवा, सोनेवाली,वगेरे टोपण नावे मला भुलवत नसत!

जगात,प्रगति ची स्वप्ने पूर्ण होणे सोपे नसते. शोभा डे चा आदर्श ठेवायला काय हरकत आहे? इंग्लिश ग्लोबल आहे? इंडियन कल्चर सुद्धा आता बदलते आहे. मॉडेल नट, लिव्ह इन वगैरे भारतात येते आहे, हो, म्हणूनच तर लोक अशाच गोष्टी चवीने वाचतात. म्हणून तर त्याच विषय वरील गोष्टी विकतात. काय विकायचे, कसे विकायचे, ते ठरवूनच वाद घडवले जातात. उदा. नथुराम, महात्मा.मिक्सचर मानवाला आवडते व शेवट गोड आवडतो.ओरिजिनलची नक्कल, रिमिक्स बघा. लोकांची मने ऑल वाचा व विचार करा, मैत्रिणीं साठी मुलाखती घ्या, वेगळया स्टोरीने ब्रांडीग होते.



तुम्ही मुलाखत घ्या, निवेदन करा, बोलणे करा, असा वैचारिक प्रवाह वाहतो आहे. इव्हेंटला जाणे ,मिटींग हे अनुभव शिकवतात. विकास हवा तर प्रयत्न करा. किचन लॉक, स्वयंपाक घराला कुलूप, असाही विचार केला पण जमेना. आपण लेखक कोण असतो? आपण मैत्री का करतो? मैत्री म्हणजे काय? हे कोण प्रवासी लोक जीवनात येतात? किती टिकतात? एकमेकांबद्दल आदर असतोच असे नाही, प्रेम तर नाहीच नाही, पारदर्शक विचार नाही, मग नाते म्हणजे काय? हे ऑफिस कि कुरुक्षेत्र ! एखादा गुरु मिळाला तर सोनेच होईल, तो सर्व प्रश्न सोडवतो, बाकी बॉस बघू बघू करणारेच! काही बॉस ,त्यांची परिस्थिती हाताळण्याची कप्यासीटी २००% मार्क्स द्यावी इतकी असते. पण असा गुरु मिळतोच असे नाही. प्रश्न सुटतातच असे नाही. उलट उथळ मध्यस्थ ते प्रश्न बिघडवतात.

उन्हात निखारलेली खडी फुटता फुटेना,

स्तनाला चिकटलेल मुल सुटता सुटेना,

बाई फुटतच राहिली, बाई फोडताच राहिली,

आतून फाटतच राहिली.

निष्क्रीयतेने भरलेले लोक काहीच करीत नाहीत. ज्ञानेश्वरीत देव प्रत्यक्ष बोलतो. पसायदान धीर देते व जीवनाची स्वच्छ जाणीव व जगण्याची प्रवृत्ती शिकवते.पण कार्यालयात यातील एकही नियम लागु पडत नाही

पुरुषाच्या दृष्टीने स्त्री, फक्त बाई होते ओझे, वाहणारी. सोन्याचा मुलामा घेऊन वावरणारी. सौदर्य प्रसाधनांनी झाकलेली.,त्या सोनेरी पिवळया स्त्री नामक रंगाचे,जातीचे रुप घेऊन आलेली, स्त्री हा पुरुषांसाठी एक नयनोत्सवच असते. बाईला मन नसते. ती थकली आहे असे कळले ,तरीही ती कोसळण्याची वाट पाहणारे ,नराधम सुद्धा असतात. अनियंत्रित अशी ती साखळी- प्रक्रिया थांबवायला, पुढे येणारे कुणीच नसते. जगी बघे भरपूर असतात. त्या अन्न दात्याचे ,धन्यवाद द्यायला सुद्धा कुणी पटकन पुढे होत नाही.

पर्ल हार्बर झालेले मन

स्वप्नांचा कचरा वेस्ट म्हणून फेकू?

डीटोंक्सिफाय झाल्यावर काय उरेल ?

घटना एखादा मिनिटच घडते?

पण परिणामी कटुता चिरकाल उरते.

भूकंप काही क्षणाचा होऊन जातो

पडझड मात्र कायम राहते.

उध्वस्ततेचे मोजमाप होते

पैसे देऊन कल्याणकारी योजना येते?

वायफळ सजावट वरवरची मलमपट्टी

उसासत राहते मी संपूर्ण एकटी

मला माझे जगू देत थोडे थोडेसे

इतरांशी माझी तुलना करू नका असे

पण एकाने हिरोशिमा केले म्हणून झाले

माझ्या स्वप्नांवर पर्ल हार्बर सारखे हल्ले

पर्ल हार्बर मध्ये मोती नाही कि पडाव नाही

उंच इमारती उध्वस्त दिसतात

मनाचे तरु कुठे कुणाला कळतात?

मी हिरोशिमा, मी पर्ल हार्बर आहे

मी जैतापूर, माझ्या ओठी उध्वस्त असा सुर आहे



## 21 दमलेल्या आईची कहाणी

नोकरी करणाऱ्या स्त्रियांचे प्रमाण १९७० नंतर खूपच वाढले. त्यापूर्वी नर्स,शिक्षिका अशा काही ठराविक क्षेत्रातच, महिलांचा शिरकाव झाला होता. कामाचे स्वरुप आणि वेऴ वाढला.सकाळी कामावर जाणारी स्त्री, पूर्णपणे थकून घरी, घरकामासाठी येऊ लागली. स्त्री पुरुष हि एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. हे वैज्ञानिक सत्य आहे. मात्र स्त्रीही पुरुषापेक्षा अधिक असुरक्षित आहे. हे सुद्धा वैज्ञानिक सत्य आहे. स्त्रीला यश सहज साध्या नसते. एक असुरक्षितता तिला ग्रासून राहते.

दैव + कर्म ,म्हणजे आयुष्यातील यश! त्यात परावलंबित्वाचे प्रमाण जास्तच असते. माझ्या लेखक कवी मनात कायम खळबळ होती. बाईबे स्वत:ला सक्षम मानने, मी समजू शकत नाही. गुणांना आकार नसतो, पण गुणांचा परिणाम दिसतो, जर बघितला तर! खरेतर काळाचे भान व संकटाची जाण ,स्त्री इतकी कुणालाच नसते. स्त्री अबला आहे ,पण तिला जी सुप्त शक्ती आहे, ती कुणातच नाही.

मला कुणी गॉड फादर नव्हते. मला कुणाचे मिंधेपण नको होते. माझे सारथ्य मलाच करायचे होते. माझा सारथी मीच होते. माझी बलस्थाने व त्रुटी मला माहित होत्या, असे प्रत्येक स्त्री सांगते. ज्यावेऴी प्रतिकूलतेतही मी संवेदना जागृत ठेवली, त्यावेळी कुटुंबाचेच हित डोळयासमोर होते. हे स्त्री सांगते,कारण ती ते जाणते. देवा धर्मा इतकाच तिचा कष्टावर विश्वास होता.

नसे राऊळी ,वा नसे मंदिरी

जिथे राबती हात, तेथे हरी

मी स्त्रियांबद्दल त्यांचा वेदनांबद्दल वाचत राहिले, बघत राहिले. महिलांच्या प्रश्नांवर,विचार चोरी करून लिहायची मला गरज नव्हती कारण समाजातील जी वृत्ती

महिलांना घातक असते. तिच्याशी मी उघड दोन हात करीत होते. "पैशा साठी वाट्टेल ते" असा हल्ली समाजातील विकृतांचा रिंगटोन आहे. नोकरी करणाऱ्या उच्च पदस्थ स्त्रियांबद्दल, त्यांना द्वेष असतो. फोटो फ्रेम मध्ये आकर्षक वाटणारे, करियरचे ,चकचकीत फोटो, फसवे असतात. स्त्री कधीही, कुठेही ,पुरुष अत्याचाराला बळी पडू शकते. जात्यातील रडतात, सुपातील हसतात. त्यात शिवाय स्त्री ही , ईतर स्त्रीयांच्या बाबत सहसंवेदना ऐवजी, हेवा व इर्षा ठेवते. त्यामुळे बाई एकटीच राहते. पुरुष अगदी शिव्या देतील ,पण शक्यतो दुसऱ्या पुरुषाला निग्लेक्ट करतात, एक स्त्री दुसऱ्या स्त्रीची स्तुती करेल, पण मनातून चिडचिड करते. आपले श्रेष्ठत्व सिद्ध करण्यासाठी बायका जी सेवा देतात त्यातून लाभ पुरुषाला होतो व हानी स्त्रीचीच होते.

घरात पगार आणणे, स्वयंपाक, घरकाम सर्व कामे एकत्रित होणे,बाईला अशक्य होते. नोकरी करणाऱ्या बाईवर टीका झाली "ते कोण आहेत बोलणारे?" अस परक्या लोकांकडून,बायांबद्दल बोलले गेले. तरीही मनातून, त्या टीकेने उठणारा, आगडोंब काही स्वप्नांची राख करून गेला, जातो. दुसऱ्याच्या नजरेतून आपली गुणवत्ता सतत चुकीच्या पद्धतीने मांडली जाणे, कुणालाही आवडत नाही. टीका करणारें, जर त्या उच्च पातळीवरचे असतील, तर ठीक आहे, अन्यथा प्राथमिक थरावरील, सतत टीका करणार्यांचे शब्द ,मुंग्याप्रमाणे दंश करतात.मात्र स्त्रीने सर्वच क्षेत्रात,राबावे, पुढे राहावे, हि अवास्तव अपेक्षा ठेवून, तिला कळसूत्री बाहुली प्रमाणे, नाचवणारे आहेत. साहित्य हा जीवनाचा आरसा असतो ,पण त्यात कल्पनेचाही वाटा असतो. त्यामुळे हल्ली नोकरी करणाऱ्या महिला, पाळणाघरे, ऑफिस मधील प्रश्न आशा प्रश्नांवरील लेखन वाचायला मिळते.

दमलेल्या बाबाची कहाणी खरी आहे?

ही कांगावखोरि जुनीच आहे.

बाबांचे कौतुक कायमचेच आहे



दमलेल्या आईची कहाणी कोण लिहिणार?

कारण गृहिणी,शेतकरीण, नोकरदार, पत्नी, आई या सर्व स्तरावर, तिची दमणूक होतेच आहे. ऑफिस मध्ये काम करताना ,मुलांकडे लक्ष कसे देणार? तिला जीव आहे कि नाही? नोकरी सोडणाऱ्या महिलांमध्ये ,खाजगी कारणाने नोकरी सोडणाऱ्या ,स्त्रियांचे प्रमाण अधिक आहे. समाजाने स्त्रीचे नोकरी करणे पैशासाठी ,फायद्या साठी ,स्वीकारले. तिचे हक्क आहअत, तिला मदत हवी, तिची शारीरिक दमणूक यांचा विचार स्वीकारला नाही. "ट्यालेंट पूल जर संभाळायचे असेल तर स्त्रियांच्या शारीरिक मर्यादा, असुरक्षितता ही परिस्थितीसुद्धा ,मान्य करायला हवी. कॉल सेंटर मधील स्त्रियांवर होणारे अत्याचार हे त्यांचा कामाच्या वेळेमुळे, अवेळी जाताना येताना ,असणाऱ्या असुरक्षिततेमुळे झाले आहेत. मुले हि स्त्रीचीच ,त्यांची जबाबदारी तिच्याकडेच, असेही पुरुष मानतात. सर्वच स्तरावर लढून स्त्री हि; वरवर, ऑल इज वेल, म्हणत असली ,तरीही आत हादरली आहे. आतून एकटी आहे. एखादी निधी नावाची बाई,कुटुंबाची सोबत न मिळाल्याने मुलांसह जीवनयात्रा संपवते. मिळवतीच्या वेदना वेगळ्याच असतात. " पाच मिनिटाचेच काम आहे" असे सांगून, सर्वच कामे स्त्रीवर, लादली जाऊ लागली आहेत. शारीरिक कष्टाची कामे, सुद्धा पुरुष अपेक्षित प्रमाणात करीत नाहीत. मात्र वर्षानुवर्ष स्त्रीचा आवाज दबूनच राहिला आहे. दमलेल्या आईची कहाणी कोण ऐकणार?

वेचीत स्वप्नांची फुले

मी डोंगर माथी आले.

अंधारी मिटली वाट,

एकटी एकटी झाले.

# 22 रान पाखरांची शाळा

त्या दिवशी घाटातून गाडी जाताना, जागोजागी पाखरांची शाळा भरलेली दिसत होती. कधी पहाटे जाग आली, कि वेगवेगळेच पक्षी बाजूच्या पडीक घराच्या, गच्चीवरील झाडांमध्ये, किलबिलाट करताना दिसतात. एकमेकांशी बोलताना भांडताना गाताना आढळतात. लहानपणा पासूनच, आई अंगणात कंपाउंड वॉलवर पक्षांसाठी पाणी भरून ठेवत असे, त्यामुळे आजही पक्षी हा जवळचा, अंगणातला पाहूणाच वाटतो. त्या साध्या सुध्या कावळयाच्या पाणी पिण्याचे सुद्धा कोण अप्रूप! तोच कावळा सोनेरी पंख घेऊन आला कि भारद्वाज होतो. माणूस किती बाहेरच्या रूपावर भुलतो बघा!

वन फॉर सॉरो टू फॉर जॉय

असे म्हणून साळुंख्याकडे बघितले जाई. एकूणच पक्षी हे त्या काळात आम्हा मुलींचे मित्र होते. पिवळे काजळ व पिवळी लिपस्टिक लावणारी साळुंकी अल्लडच वाटे. पाणथळ जागेपाशी ,म्याडमच्या डोहापाशी, गेलो कि दिसणाऱ्या पांढऱ्या साळुंकीची ती गूढ साद,मृत्यूची भीती दाखवी. टिटवीला मृत्यू दिसतो म्हणून ती टिव-टी (म्हणजे ज्या व्यक्तीचा जीव) असे तिच्या भाषेत बोलत असावी. त्यांच्या त्या पक्षी समूहांच्या सुद्धा शाळा असाव्यात व एखादी टिटवी नापास झाली, म्हणून खेद व्यक्त करत असावी. सन बर्ड किंवा पिवळया पंखांचा पक्षी, दिसला तरी मन, त्या रंगांच्या देखाव्यावर खुश होते. मॉरीशसला लाल पिवळया, हिरव्या वाट्टेल त्या रंगांचे ,पक्षी दिसतात. काही बिनधास्तपणे जवळ येतात. कधी पळून /उडून जातात. हम म्हणजे आपण, असे म्हटल्यावर जो आवाज येतो तसा आवाज करणारा हमिंग बर्ड, हुक हुक ओरडणारा भारद्वाज, मनाला भावतो. रान पाखरे झुंडीने थव्याने जंगलात उडतात.



रानमेव्याचा फडशा पडतात. रानपाखरांची शीळ आगळी वेगळी असते. जणू ते शाळेचे पाढे म्हणत असावे.

पानथळी जवळ हिरव्यागार हिरवळीवर, पांढऱ्या बगळयांची शाळा भरते. सर्वजण पांढऱ्या गणवेशात पण अभ्यासाचे ढोंग करणरे व आपण जसे चोरून चॉकलेट खातो तसे किडे खाणारे! त्यांची एकी बघून बरे वाटते. कधी कधी पारव्यांची शाळा विजेच्या तारांवर भरते. करड्या रंगाने फारसे नजरेत न भरणारे पारवे,व गुटूर्गु करणारी कबुतरे, नगण्यच वाटतात. रान फुलांसारखे रानपाखरांचे आयुष्यही दोनतीन आठवडेच असते. नाचरा,ढाल तलवार पक्षी, हा मधेच ढाली सारखी, शेपूट गोल फुलवतो. काळा लाल बुलबुल, मात्र त्याच्या शेपटी खाली, लाल डाग व पांढरा ठिपका असतो. माळशेज घाटात दिसणारा माळढोक किंवा सारस पक्षी किंवा शिवडीला येणारे फ्लेमिंगो मला परकीय पाहुणे वाटतात.

पक्षीराज गरुडा बद्दल, आदर वाटतो तर बहिरी ससाणा ,डोळे फोडतो या समजुतीने त्याची भीती वाटते. रंगीबेरंगी तुर्रेबाज ,काकाकुआ, बुलबुल, फ्यानबर्ड वगैरे डौलदार पक्षी देखील असतात. पण ते उगीचच भास मारू वाटतात. राजहंस दुध/खीर वेगळी करून पितो म्हणून आपण त्याचा आदर करतो. मैना, वेडा राघू, पोपट हे आपले गावाकडचे पाहुणे वाटतात. चिमणी हि गप्पा मारायला येणारी शेजारीण वाटते. खंड्या "उठ विडी पेटव" अशी आरोळी ठोकतो. जंगलात चित्रविचित्र साद घालणारे पक्षी कधी घाबरवतात तर कधी सोबत येतात. रस्ता न चुकता, रात्री पक्षी आपापल्या घरट्याकडे परत येतात. साप किंवा अन्य प्राणी जेव्हा पक्षांची अंडी खायला येतात ,तेव्हा पक्षी खूप आरडाओरडा करून त्याला दूर पळवण्याचा प्रयत्न करतात. पक्षांची घरटी आकर्षक सुबक वाटत. आपल्या पिल्लांसाठी चारा आणणे व त्यांच्यासाठी सुबक घरटे बांधणे. अशा मुलभूत उर्मी, पक्षांमध्ये हि असतात. पक्ष्यांची स्वतंत्र भाषा असते. व माणसा सारखेच ते आई कडून शिक्षण घेतात व पुढे शाळेत

(समूहात) शिकतात! ऑस्ट्रेलियन शहामृग, भारतातील इमू ,मॉरीशसचा डोडो,देह आकार आणि  रुपाने  वेगळेच असतात.

मोराचा उल्लेख केल्याशिवाय, पक्षी पुराण संपणारच नाही. मोर हा आपला भारतीय राष्ट्रीय पक्षी आहे. सुंदर पिसारा, मोरपिसे, रंग आकर्षक, नाचणे थुई थुई यामुळे तो सर्वांचा लाडका असतो, त्याचा केकारव कर्कश वाटतो व त्याचे पाय कुरूप असतात. पक्षी म्हणजे सुंदर उडणारे स्वप्न मानले तर पाय हे वास्तव समजायला हरकत नाही. स्वप्नाचे कटू वास्तव, अधोरेखित करणारा मोर, हा लाडका आहे. तरीही अध्यात्मिक सुद्धा आहे. रान पाखरांची सुद्धा ,एक शाळा असावी असे एकूण वाटते,बघून वाटते.

तेव्हा पक्षांकडे बघून माणूस प्रेम, जीवनाची क्षणभंगुरता शिकू शकतो! जेव्हा उन्हाळयात आपला जीव तहानेने तळमळतो त्यावेळी त्या एवढ्याश्या जीवावर काय वेळ येत असेल? त्याच्या अशक्त पंखामध्ये उडायला पुरेसे बळ सुद्धा नसते. शाळेचे व परीक्षांचे त्यांनाही टेन्शन असेल का?

अशावेळी आपण पक्षांसाठी अंगणात पाणी ठेवले तर?

तुम्हाला काय वाटते?

रान पाखरांची शाळा तुमच्या अंगणात भरली तर? नाहीच कुणी खास आले तर, चार कावळे तर येतील. पहा

पक्षी म्हणजे ,देवाचि नक्षी होत.



## 23 गरुड झेप

गरुड झेप घेणे हे प्रत्येकाचेच स्वप्न असते. गरुडांमध्ये ती क्षमता असते. एकदा एक गरुड पक्षी काही केल्या उडेना, त्याच्या एका वरिष्ठ स्नेह्याने त्या गरुडाला विचारले

"तू काही स्वप्न पहिले आहेस का?"

गरुड : "हो, स्वप्न प्रत्येकच व्यक्ती पाहते. मात्र कधी ते स्वप्न मृगजळ ठरते. वाळवंटातील हवा गरम असल्या कारणाने हवेतील अणु, खूप जवळ येतात. तसेच मेंदूतील पेशींवर पण भार वाढतो व माणसाला त्याच्या इच्छे नुसार, सुखद भास होतात व माणूस त्या स्वप्नमय परिस्थितीला सत्य मानतो. यालाच मृगजळ म्हणतात.

गुरुजी सत्य, स्वप्न, मृगजळ यातील फरक मला समजेनासं झाला आहे. "

गरुड - बेटा स्वप्न सुंदर असते"- गुरुजी! गरुडाचे डोळे भरून आले. "बेटा म्हणालात म्हणून मनापासून सांगतो, स्वप्न सुंदर असेल, तर ठीक आहे, पण त्यातसुद्धा स्पर्धा, आकस, द्वेष, संताप असेल तर? स्वप्नांची चौकट आकर्षक असेल व आतील चित्र धुरकट असेल तर?

गुरुजी- स्वप्नांची भीती वाटते का? अनिश्चितता सगळी कडेच आहे रे!

गरुड- मी आहे त्या फांदीवर मुंग्या दंश करतात. फांदीच्या टोकावर बसणारा एक पक्षी जो आमच्या प्रश्नाशी पूर्ण पणे अनभिज्ञ आहे तो आमचा बॉस आहे. मोठी मोठी तत्वे तो आम्हाला सांगतो. हे कराव, ते करा अशा सूचना देतो. मी यंव  नि त्यंव,

मी त्या झाडावर असताना मुंग्यांचे वारूळ हटवले. अमक्या तमक्याला सरळ केले. वगैरे सांगतो. मात्र आमच्या फांदीवर येवून फुत्कार सोडणाऱ्या सापाला करंडीत पुन्हा भरण्याची हिम्मत त्या बॉस मध्ये नाही. त्यामुळे या त्रासदायक फांदीवर बसून राहतो. पण मन निराश होते, नाकोशांचा सहवास सोसावा लागतो. या फांदीवर मी माझे गाणे विसरलो आहे. या फांदीवरील कुणालाही एकमेकान बद्दल प्रेम-आदर नाही. खाऊ गल्ल्या आणि फीलगुडच्या त्या झुंडीमुळे मला कधी कधी खूप एकटे वाटते. मात्र मला या फांदीवर तीन इंचाची जागा आहे. मस्टरवर सहीला तीन इंच जागा असते ना, तशीच आहे.येथील पक्षिणी स्वतःची अंडी जपतात. माझी अंडी साप खायला आल्यावर उडून जातात. त्याच्यातील स्वार्थ सुधा मला सहन होत नाही. माझ्या प्रश्नांशी त्यांना देणे घेणे नसते वरवर गोड तान मारतात

गुरुजी - "बेटा, मग तू इथे का राहतोस ? उड !

गरुड- “इथे सुरक्षितता आहे. बाहेर ईतर लोक मला त्रास देतील, दंश करतील, माझ्या विरुद्ध काव काव करतील पण हे लोक माझे आहेत. या खोट्या भूमीवर मी या फांदीवर बसून राहतो. तो भ्रम आहे, हे स्वार्थी लोक,----” गरुड सुस्कारा सोडत म्हणाला.

गुरुजी- “मग तू उडून का जात नाहीस आकाशात झेप घे. जग मोठे आहे.”

गरुड- “अनेक वर्ष मी या खुज्यांमध्ये राहून उडणे विसरले आहे”

. त्यामुळे माझ्या लायकीच्या माझ्या कथेच्या साजेशा गाण्यांवर मी खुश होतो, पण गात नाही. उदा.        यु सारी जिंदगी मरमर के जी लिये ,**इकपल तो अब हमे जिने दो जिने दो |**

मी जगू या आता,असे म्हणतो. जगत मात्र नाही. आता उडायची इच्छा झाली, तरी अपयशाची भीती वाटते. या वयात लेखिका/लेखक व्हायचे ठरवले, एकपात्री



प्रयोग केले. तर ओल्ड इज गोल्ड असा म्हणणार नाहीत. "तरुणांच्या संधीच्या क्षेत्रात आलात" असे म्हणतील, हि भीती वाटते. यशाची शाश्वती नाही. कधी कधी रात्र रात्र मी जागाच राहतो. सोबतच्या सहकार्यांनी केलेला दंश आठवतो. बॉसची बकवास बडबड कपाळात जाते. सुटून गेलेल्या संधी आठवतात. अनेक वर्ष केलेलं कष्ट, हालअपेष्टा आठवतात. आता मी गरुड झेप कशी घेऊ?

गुरुजी- "तळयातील वेडे कुरूप पिल्लू राजहंस असते, माहित आहे ना? त्या कुरूप पिल्लाला इतर पिल्ले टोचतात. एकटे पाडतात. कारण ते वेगळे असते. तुझ्यात काही वेगळे असेल व त्या गुणांचा हेवा वाटत असेल, म्हणून ते ईतर तुला कळपातून दूर ठेवत असतील. तुझ्या त्या असामान्य गुणांची, त्यांना भीती वाटत असेल. तुझ्या सहवासात त्या ईतरांना त्यांचे खुजेपण सतावत असेल. म्हणून ते तुझे खच्चीकरण करीत असतील.

गरुड- “कारण काहीही असेल पण मला त्या सहकार्यांचा त्या पक्ष्यांचा, त्या किड्यांचा त्रास होतो, पण माझ्या पंखांमध्ये पुरेसे बळ नाही. जाऊ दे ! चालू आहे ते ठीकच आहे ! आयुष्य संपले असेच थोडे उरलेय. तेही जाईल. असे म्हणत मी बसून राहतो. खंत करतो.”

गुरुजी- “अरे प्रयत्न कर ! घे ती गरुड झेप! पडलास तर पडलास !”

गरुड- “मग मला सर्वजण  अधिकच हसतील. हि फांदी सोडून गेलो आणि उडण्या ऐंवजी पडला. आकाशाचे स्वप्न पहिले आणि पाला पाचोळा झाला. मातीमोल झाला असे लोक बोलतील,मला हसतील.”

गुरुजी- “तरीही प्रयत्न कर रे बेटा. फांदी तुटल्यावर, जर तुटली तर तू उडशीलच  ना!”

गरुड- “गुरुजी मी विचार करीन!”

आयुष्यभर गरुड,राजा असुनही,

त्या मुंग्यांचा दंश व बॉसची बकवास, ऐकत ,

त्या पोखरलेल्या फांदीवरच, बसून राहिला.

त्याने कधी गरुडझेप घेतलीच नाही.

अनेक गरुड कोंबड्यांमध्ये राहून,

गरुड झेप न घेताच जातात संपून

कलावंताचे हात जातात आखडून.

मित्रहो, आपल्या मनातील आतल्या ,लपलेल्या गरुड पक्षाला विचारा !



## 24 द्रष्टा स्वीकार

खरेतर तशी मी ,मंदीरांचे रंगांमध्ये, रमणारिच होते. आणि एकदा मला वाटले साई बाबांच्या मूर्तीच्या डोळ्यात पाणी आहे. साईबाबा "मी काहीच करू शकत नाही, मी हताश झालो आहे" असे मला सांगत आहेत. मी चपापले. पुन्हा पुन्हा निरखून बघूनही ,मला ती डोळ्यात पाणी आलेली मूर्तीच तशीच वाटली. मी देवऴातून बाहेर आले. दिवसभर कामात आठवले नाही. मात्र रात्री झोपेत मला स्वप्न पडले. रानटी कुत्र्यांची एक टोळी मला पाहून, जोरजोरात भुंकत आहे. व मी केविलवाणी झाले आहे. त्यानंतर माझी बदली, अशा ग्रामीण भागात झाली जिथे आर्थिक फायद्यासाठी, तेथील काही लोक ,माझ्या विरुद्ध खोट्यानाट्या तक्रारी करू लागले. कर्जासाठी भांडणे करू लागले आणि मी हैराण होऊन त्यांचे ते भुंकणे सोसण्याच्या पलीकडे, काहीही करू शकत नव्हते. दुःस्वप्नाचे वाचन करता येते, परिमार्जन मात्र अवघडच असते. मी गाडीतून ऑफिसला जाताना, एक चहाच्या टपरीवर रोज एक गाणे लावलेले असते.

"मैं रोज एक नये गम कि राह तकता हु

किसी खुशीका मेरे दिल को इंतजार नही

त्या योगा योगाचं मला नवल वाटे. गूढ अशी पूर्वी न कळलेली गोष्ट, भविष्यकाळ हा काहीजणांना, स्वप्नातील पूर्व सुचने मुळे कळतो. भावी आयुष्यातील संकटे त्यांचे शकुन माणसांना जाणवतात. पण आपण त्याचा अर्थ लावू शकत नही. अर्थात अर्थ लागूनही, त्या घटना बदलतात ,असेही नाही. अतींद्रिय शक्तीची, साधना करावी लागते. तिचा अभ्यास करावा लागतो. व त्यामुळेच कदाचित भविष्याच्या

काळातील,सूचनांचे ओझे वाहावे लागते. किंवा मग त्या संकटाला तोंड देण्याची, खंबीर मानसिकता, मानसिक तयारी होते. भविष्याचे काही क्षण, अंतर्मनाच्या व सृष्टीमनाच्या वेव लेन्थ वरून दिसतात. ज्या व्यक्तींना अशा भविष्यातील घटना दिसतात. त्यांना द्रष्टा असे म्हणतात. दृष्टीचे रूप अधिक तीव्र झाल्याने, त्या दृष्ट्या ठरतात. माझ्या बहिणीची जन्म कुंडली, प्रत्येक ज्योतिषी ,कोरीच ठेवत असे. (ती अचानक वारली) शकुन -अपशकून अशा शब्दात, आपण अशा अनुभवाचं, वर्गीकरण करतो. कधी कधी अंधश्रध्दा म्हणून हे विषय उडवून सुद्धा लावतो. मात्र अशी एक शक्ती असते. जिला intuition म्हणतात. जी निदान हुरहूर तरी लावते. फार वर्षापूर्वी सुनामीचे भाकीत, एका भविष्य वेत्याने स्वप्ना नुसार केले होते. एका पटकथा लेखकाने, त्याच्या कथेत पेढे खावून मरणारा, द्रष्टा रंगविला आहे. एका विदेशी लेखकाने तर कथेत, उंच इमारतीवर विमान जोरात आदळवून ती इमारत जमीनदोस्त करण्याच्या अतिरेकी हल्ल्याचे वर्णन, २००१ साली केले गेले होते. अशा शक्ती संकटापासून वाचवू शकल्या नाहीत. तरी ती पूर्व सूचना, हादरवून सोडते. काही व्यक्तींच्या जवळ गेले, कि अशा त्या नकारात्मक तरंगांच्या लहरी, द्रष्ट्याना अस्वस्थ करतात. एखाद्या घरी, एखाद्या पडक्या विहिरीजवळून,  लवकर बाहेर पडले, तर बरे असे वाटते. तिथे काहीतरी वाईट आहे, हे कळते पण काय? हे सांगता येत नाही. सामान्य माणसाला सुदधा, कधी कधी शकुना द्वारे, देव काही सूचना देतो.

काही व्यक्तींचे शब्द खरे होतात, त्यांना काळ्या जिभेची व्यक्ती म्हणतात. शरीर, मन, मेंदू, त्यांच्या पलीकडे त्या अतींद्रिय शक्तीने मिळणारी सूचना, संरक्षक सुद्धा ठरू शकते. धक्का बसणे किंवा आश्चर्य वाटणे घ्या दोन धक्क्यातून द्रष्टे सावरतात. पण काहीतरी वाईट घडणार आहे हि सुन्नता त्यांना भरून राहते. गट फिलिंग अशी वाटते, असे आपण नेहमी म्हणतो. "आज बाहेर पडू नयेसे वाटते" असे जेव्हा वाटते, तेव्हा आपली अतींद्रिय शक्ती आपल्याला संकटापासून वाचवत असते. तरीही जे घडणार असते ते चुकत नाही.

होणारे न चुके. जरी येई ब्रह्मा तया आडवा !



परमेश्वराची भक्ती करून, संकटांची तीव्रता कमी होते. पण संकट टळतेच असे नाही. शेवटी "आलीय भोगासी असावे सादर" म्हणून जे जे पुढे लिहिलेले असते. ते सामोरे आल्यावर स्वीकारावेच लागते. पूर्व सुकृताने किंवा गेल्या जन्मीचा काही हिशोब चुकवणे, बाकी असेल असे म्हणून, मी माझ्या कामकाजाच्या जागी चालू लागते.

समोर जे दिसते, ते बघून प्रश्न सुटणार थोडीच असतो. मंदिरातील साईबाबांची मूर्ती, ज्या दिवशी मला आनंदी दिसेल, त्या दिवशी माझी बदली सुरक्षित गावी होईल, असे माझे अंतर्मन मला सांगते आहे. तोपर्यंत पूजांना,व्रतांना अंत नाही. देवळांना नाही व आशेला नाही.

द्रष्टा स्वीकार यालाच म्हणत असावे.

# 25 या दिल कि सुनो

या दिल कि सुनो दुनियावालो,

या मुझको अभी चूप रहने दो !

नव्या अशा ज्या प्रश्नाला मी सामोरी जाणार आहे, त्याला मी सुख म्हणू शकत नाही. खरेतर आयुष्यातील अनेक निर्णयांमध्ये ,आपल्याला गप्पच बसावे लागते. तो निर्णय कुणीतरी भलतीच व्यक्ती किंवा समष्टी घेते आणि मग आपण कळ सूत्री बाहुली प्रमाणे त्यात नाचवले जातो. बदल-बदला-बदली ! हे दुःख मीच विकत घेतले होते व आताही घेणार आहे. खरे तर दुःख म्हणजे तरी काय असते? जे हवे ते न मिळणे व नकोसे वळण सामोरे येणे, ठेचकाळणे, पडणे, रडणे. ते स्वीकारावे लागणे हेही दुःखच ! बदलीचे दिवस वादळ घेऊन येतात. खरेतर पदोन्नती मिळणे, हि किती आनंददायी गोष्ट असते. आकर्षक प्याकिंग ,मध्ये गुलाबी रिबीन बांधून, ते सुंदर बक्षिस मिळावे ,पण १४० पुरुषांमध्ये जेव्हा एकटीच महिला मी पास झाले, तेव्हा वाटलेच नव्हते, हि पदोन्नती इतरही काही घेऊन येईल. खोट्या समाधानासाठी खोटी चमक, आकर्षक रंग घेऊन मृगजळ येईल!

घर से चले थे हम तो ख़ुशी कि तलाश में

गम राह में खडे थे वही साथ हो लिये !

जीवनात,नोकरीत बदल अपरिहार्य असतो. पण काही बदल दुःखदायक सुद्धा असतात. न रडता न भेकता विरोध सुद्धा न करता, आपण मार्ग बदलतो. ती हि बदली, हा बदला म्हणून आपल्यावर घेतलेला सूड असतो. मराठी माणूस, साधे माणूस ,त्याचा आत्मविश्वास हरून त्याने हद्दपार व्हावे, म्हणून तो रचलेला बदला असतो. खरेच असे बदल ,अपरिहार्य असतात का? किती स्वप्नांच्या शुष्क काड्या, मोळी बांधून सोबत घेऊन पुढे जावे लागते. आपण काडी काडी जमवून रचलेले ,ते घरटे ,तसेच मागे सोडून आपण निघून जायचे असते. आपल्या कष्टांवर इतरच कुणीतरी राज्य करणार असते. आपल्या भोळेपणाचा व साधेपणाचा फायदा घेऊन ,आपला गेम केलेला असतो.



अति साधे असणे व नितीमत्तेची पातळी सोडून खाली उतरणे मला जमत नाही. हा माझा दोष असावा का? काही दिवसांनी माझ्या सारख्या व्यक्ती,डायनोसोरस सारख्या म्युझियम मधेच ठेवल्या जातील.

परिस स्पर्श देणारे अल्केमिस्ट फक्त पुस्तकातच असतात. हल्लीच्या सीतेच्या रामायणात रावणच ,खूप जास्ती असतात. राम नसतो,नसावा,नसु दे ,म्हणूनच तर मी म्हटले आहे,

या मुझ को अभी चूप रहने दो !

# 26 बुजगावणे

शेताणत जुन्या कापडांचे, काठ्यांवर मडके पालथे घालून ,बुजगावणे बनवले जाते. कुणीतरी तिथे वावरत असल्याच्या, या आभासाला घाबरून पक्षी, पाखरे, शेतात नासधूस करत नाहीत. कुण्या एकट्या काम करणाऱ्या व्यक्तीला या बुजागावण्याची, साथ सोबत उपयोगी पडते. बुजगावण्याला स्टाइलिश शब्दात विझुका , स्केअर क्रो सुद्धा म्हणतात. पण शेवटी बालपणी आपण जेव्हा बुजगावने बनून इतरांशी खेळतो ते बुजगावणे आठवते. वयापेक्षा मोठे होणारे कपडे घालून आपण शाळेत जातो, तेव्हा मित्र बुजगावणे म्हणून आपल्याला चिडवतात.

अानंदाची आस धरून आपण कुठेतरी माणुसकीचा ओलावा मिळेल. दोन घडी गप्पा मारायला कुणीतरी सवंगडी मिळेल म्हणून, त्या बुजगावण्याच्या दिशेने पाय ओढत जातो. ते निर्जीव बुजगावणे ,न साथ करते, उलटपक्षी नाराज करते व फसवणूक सुद्धा करते. कधी नोकरीत वरिष्ठांनी ,आपल्याला काही मदत करावी, काही कठोर निर्णय घ्यावे, असे वाटते. मात्र वरिष्ठ आपलीच कातडी व लोकप्रियता वाचवतात. तेव्हाही त्या बॉसला बुजगावणे म्हटले जाते.

जात पंचायतीत जेव्हा न्यायासाठी लढा दिला जातो. एखाद्या हक्कासाठी जेव्हा संघर्ष केला जातो तेव्हा सुद्धा नुसतीच उभी असलेली,मानवी बाहुल्या भासणारी, भेटणारी ,निर्जीव बुजगावणी असतात व भोळी पाखरे फसतात. जगात देव तरी असतो का? अस्तीकतेच्या व नास्तिकतेच्या वादात न पडता मला कधी कधी वाटते ,देव हि संकल्पना सुद्धा, एक बुजगावणे असावी, हिंदी सिनेमात नटी देवाला आळवणी करणारे गाणे म्हणते व मग तो देव येउन व्हिलनला मारतो. देव कधी सापाच्या रुपात



कधी त्रिशूल बनून कधी गरुडपक्षी बनून येतो ,अशा कल्पना या चित्रपटामध्ये नेहमी आढळतात. प्रत्यक्ष आयुष्यात मात्र तसे घडत नाही. देव देवळात नाही म्हटले जाते ,पण कुठेतरी त्याचे अस्तित्व असायला काय हरकत आहे? कदाचित देव, या संकल्पनेच्या भ्रामक आधारावर, जगण्याची सुरुवात, म्हणून बालपणापासूनच होत असावी.त्या बुजागावण्याचा प्रतिक म्हणून आभास दाखवला जात असावा.बुज याचा अर्थ वावर, बुजगावणे म्हणजे माणसांच्या त्या वावराचा आभास, सापडणे (गावणे) असावे.

निर्जीव अशा बुजगावण्याच्या मांदियाळीत

देवऴा रावऴांचे आऴीत,

खरे तर ,न माणूस सापडतो, न देव सापडतो.

# 27 बहिरा देवीचे मंदिर

पिंपळपाराच्या पाठीमागे, ते बहिरा देवीचे मंदिर होते. येता जाता, मी हात जोडून ,नमस्कार करीत असे. तिथून पुढच्या वळणावर, बहिरादेव बाबा, बहिरोबदेव नावाचे एक मंदिर होते. मात्र या मंदिरावर छत नव्हते. मूर्तीसाठी चौथरा होता व वरती उघडे आकाश होते. वाचेने , अन्यायाबद्दल बोलू न शकल्याने व माझे म्हणणे कुणी ऐकून न घेतल्याने, नाईलाजानेच मी या बदलीच्या गावी रुजू झाले. पण त्या मंदिराजवळ आले कि मला वाटायचे देव आणि देऊळ नाही? उघड्या चौथऱ्यावर देव,उन्हा तान्हात पाऊस वाऱ्यात सहन करीत उभा आहे. माझ्या सुख दुःखाची ,त्याला काय जाणीव होणार? धो धो पावसात, लेडीज छत्रीच्या अर्धवट संरक्षणात, मी जे वावरते, त्यात तो देव मला मदत करेल का? कधी काळी तिथे देवीला दहीभात व अगरबत्ती घेऊन जाऊ या, असे ठरवले होते. गावातील लोकांची श्रद्धा होती कि नाही, माहित करून घेणे जमले नाही. देव या विषयाचा माझा व्यासंग व अभ्यास दांडगा आहे! पावणाऱ्या न पावणाऱ्या सर्वच देवांची व्रते मी करीत असते.

परिपूर्णता हवी म्हणून मी भटकत राहिले. प्रसादाचे आशीर्वादाचे पसायदान मला देवाने द्यावे असे वाटत असे. देव आंधळा असतो असा आरोप असतोच ,पण माझा व माझ्या सारख्या इतर काही भक्तांचा आवाज ऐकू न शकणारा, तो देव बहिरा आहे असा आरोप इतर कुणीही केला असावा. बहिरोबा देव व बहिरा देवी मला पावल्या वरच कळेल ,तिला ते नाव का पडले? किंवा बाहेरच्या आवाजां बाबत मी "बहिरी " होईन.



बहिरेपणा हा सुद्धा मोठा सद्गुण आहे, हे मला समजावे म्हणूनच कदाचित ते देऊळ मला दिसत असे. कामावर जाताना व येताना सुद्धा. "हे जमणार नाही" म्हणत ते सोसताना बहिरे होणे, हाच उपाय होतो. बदली होती का बदला होता, कळत नव्हते. ऐकावे पण बोलू नये हाच पर्याय होता. अपेक्षे पेक्षा अधिक लौकर बोलणाऱ्यांची तोंड बंद होतात. त्यांना नवीन विषय आणि नवीन टार्गेट मिळते. बायका फारच बोलतात असा आरोप नेहमीच असतो. खरेतर बोलाणारे बरेच असतात, ऐकणारे कमी! ऐकून न ऐकल्यासारखे करणे, हा यशाचा यशस्वी मार्ग सांगणारे, बहिरोबा देव व बहिरा देवी ,मला प्रसन्न होवो म्हणून प्रयत्न करायचे ठरवले. "तुम्हे घर मुबारक, हमे अपनी आहे." म्हणत नोकरीच्या ठिकाणी मी पाय ओढत जात राहिले. किती दिवस जावू शकेन, सांगता येत नाही, तो पर्यंत बहिरोबा देवाच्या कानी माझे गाऱ्हाणे पडले नाही. ऐकू येऊनही ,त्याने ऐकले नाही ,असेच म्हणायचे .

पाप्यांची कारस्थाने नको पडाया काना<br>
त्यापेक्षा भले मी बहिरा बरा !

## 28 एकटाच पक्षी फिरतो आहे

सभोवती अंधार दाटत आला आहे

सर्व पक्षी सोयीस्कर जागी निजले आहेत

तडजोड करून स्वार्थ बघून

हवे ते मिळवून रमले आहेत

एकटा पक्षी फिरतो आहे

स्वातंत्र्याची किंमत देण्यासाठी

घरट्या पासून दूर फाटक्या पंखानिशी

आशा संपली आहे पंखातील बळ संपले आहे.

पक्षी उडताना सुरक्षितता बघतो पण म्हणून तो पिंजऱ्यात राहणे स्वीकारेल? मग तो पक्षी कसा म्हणता येईल? कमी त्रासाचा, मार्ग स्वीकारणे व यश येत नसलेल्या युद्धात हार मानणे ,कॉमनच असते मात्र म्हणून, ऐच्छिकपणे पिंजरा स्वीकारणारे पेट पक्षीहि असावेत.

"बहती हवा सा था वो,

उडती पतंग सा था वो,

कहां गया उसे ढूढो" याच्या बरोबर एक थवा सुद्धा होता. फायदा मिऴत नाही ,म्हणताच थव्यातील पक्षी गळाले. एकेक करून ,सोबती मागे पडले. एकटाच पक्षी, कावरा बावरा होऊन, गगन भरारीची स्वप्ने बघतो आहे. त्याच्या पंखातील बळ संपले आहे. अंधार दाटला आहे. पिंजर्या बाहेर असुरक्षित असूनही,काही पक्षी स्वच्छंदीपणे उडत आहेत. अजून फुलांना सुगंध येतो आहे. त्या फुलांच्या परागकणासाठी भुंगे येत



आहेत. त्या वासाने पक्षी सुद्धा खुशीत आहेत. पण पक्षी पिंजऱ्यात किती काळ राहू शकतो? तो आझाद कधी होणार? खरेतर पक्ष्यांना माहित असते, माळी बदलला, ऋतू बदलले, तरीही उशिराने का होईना बहर येइलच. आपले गाणे त्या बहारीत ,गाण्यासाठी पक्षी म्हणे वाट बघतात. राखून ठेवतात. पक्षांना माहित असते पिंजऱ्यात राहून आपल्याला खरे गाणे गाता येणार नाही.

" युं सारी जिंदगी मरमर के जी लिये

एक पल तो हमे जिने दे, जिने दे

म्हणत दोन घडीची उडान काही पक्षी घेतात,संधि घेतात. मात्र ती झेप अल्पजीवी ठरावी? पंख गळून पडावे? पक्ष्याला पिंजर्यात घालण्यासाठी ,सर्व पारध्यांनी जाळे टाकावे?

कधीतरी पक्षी जायबंदी होणार आहे.

पण सध्या तरी तो एकटाच पक्षी फिरतो आहे.

# 29 कोरा चित्रफलक

कोरा क्यानव्हास, कोरा चित्रफलक ,हा चित्रकाराला बरीच स्वप्ने दाखवू शकतो.दुर्दैवाने चित्रफलक बऱ्याचदा कोराच राहतो. प्रत्येकाचीच इच्छा असते, चित्रकार होण्याची! पण आयुष्याच्या त्या rat race मध्ये टीचभर पोटाची खळगी भरण्यासाठी, धावण्यात ,रंगपेटी व चित्रकला मागे पडते व म्हणायची वेळ येते. "मी पूर्वी चित्र काढत असे" आपला क्यानव्हास कोरा राहण्याची वेदना, पहिल्या पगारात मॉल मध्ये खूप, खरेदी करून कमी केली जाते. तरुण अशा ,त्या रेषा चित्रकलेची झलक, वहीच्या मागील पानावर, मुलांच्या वहीत, आपण कधीतरी दाखवतो ,पण हळू हळू ती चित्ररेषा पुसट होते. पैसा कमावताना, आपण नक्की कोणत्या उंची पर्यंत, पोहोचायचे याची मोजपट्टी नसल्याने ,ध्येय पुढे पुढे सरकते व कला मागेमागे पडते. चित्रातील रंग व रेषा मनाला भुरळ घालेनासे होतात. कुठल्यातरी कट्ट्यावर जूना मित्र भेटतो. विचारतो

"हल्ली तू पूर्वीसारखी चित्रे काढतोस का?"

आपण हसतो व सोडून देतो. कुणापेक्षा तरी अधिक पगार मिळवणे व अधिक श्रीमंत होणे यातच आनंद वाटायच्या वयात, आपण कधी आलो, ते कळेनासे होते. विस्मृतीत गेलेल्या, त्या कलेची, दफन भूमी आठवण्यात व त्या चित्रांबद्दल बोलण्यात, रस उरत नाही. माणूस समजून घेणे अवघड असते. माणसांचा सहवास ,आनंददायी राहण्यासाठी, प्रयत्न करूनही ,यश येतेच असे नाही. चित्रकला मात्र कायम आनंद देते. चित्रकलेचा आनंद हि सुखाची ठेव ,कोणत्याही वयात उपभोगता येते. पूर्णपणे अनोळखी व्यक्तीं कडे आपण काहीही बोलून मोकळे होऊ शकत नाही. पण चित्रे ते काम करतात.तसाच कला हा प्रांत अनोळखी व अज्ञात मैत्र मैत्रिणींचे ऐवजी, खास



सखीचे काम करतो. आपल्या पाऊल खुणा, चित्रकले द्वारे स्पष्ट मांडता येतात. पण समाजाचे मत हि पाचवी धनशक्ती मानून ,मग आपण कलेला आपल्या जीवनातून हद्दपार करतो.

रंग, रेषा खडू, कागद, आकार, रेषा बिंदू या पलीकडे चित्रकला म्हणजे खूप काही असते. हिमनगाचा जसा १/७ भाग दिसतो व ६/७ दिसत नाही तसे चित्रांचे असते. चित्रांमध्ये दृश्य दिसणाऱ्या भागाहूनही, अदृश्य भाग अधिक असतो. जीवनाला, क्यानव्हासची उपमा दिली जाते. कुठलाही क्यानव्हास, कोरा राहू नये. आपली चित्रकला, जीवनाशी समांतरच चालू राहावी.

कुंचला उचला या कोऱ्या कानव्हासवर, तुमचा लाडका मनासारखा मास्टर पीस बनवा.

# 30 पण तो आहे.

देव कुणी पहिला?

देवाचे घर कुठे आहे? कसे आहे? कुणीही उत्तर देऊ शकत नाही. पण तो आहे. देव हि एक मनाची आवश्यकता असते. कारण त्याच त्या, कल्पनेवर माणसाची आशा घडते. कुणावर तरी सर्व सोपवून निर्धास्त राहण्याची, आपली गरज "देव" हि कल्पना पूर्ण करते. आपल्या अपयशाचे खापर फोडायला व आधाराचा हात मागायला, मनाने निर्माण केलेले एक बुजगावणे म्हणजे "देव" असावा .असेच काहीसे शास्त्रज्ञ म्हणतात. अतींद्रिय शक्तीवर अवलंबून राहने तसे घातकच असते. परमेश्वरी ऐश्वर्याचे मृगजळ हे मानव प्रगतीला घातक सुद्धा ठरू शकते. जीवनातील प्रश्न, मानवाने सोडवायचे असतात. ते कधीतरी सुटतील, म्हणून देवावर सोडायचे नसतात. प्रयत्न करायचे असतात. देव कल्पनेत प्लेस्बो असतो.श्रद्धा व अंध श्रद्धा ,मधील फरक जाणवायचा असतो. अनादी काळात वेद होते " नंतर देव आले नंतर प्रत्येकाचे आदर्श बदलत गेले. प्रमाणे बदलली, परमेश्वराला रिटायर्ड करा ,अशी एक नास्तिक चळवळ मध्यंतरी सुरु झाली होती. त्यामागे मानवाने प्रयत्न वाढवावे, हीच इच्छा असावी. कित्येक वेळ आपल्याला सुद्धा वाटते कि success is a chance "

संस्कृती मधील अनेक कल्पनांमध्ये, देवाची तोंड ओळख येते व या ओळखीतून पुढे सर्व काही त्या देवा वर सोपवायचे हि संकल्पना जन्म घेते. परमेश्वर या कल्पनेच्या चौरंगावर, मग श्रद्धेचे निरंजनात कर्मकांडाची फुलवात पेटते. देव देवळांमध्ये, मूर्तीमध्ये असतो का? माणसाच्या मनामधील देवाचे काय? व्रतवैकल्यांना जरूर फळ



येते, हे संशोधनाने सिद्ध झाले आहे. अर्थात याचे कारण तीव्र इच्छा शक्ती हे असू शकते. आत्म क्लेशातून परमेश्वराच्या अधिक जवळ जाता येते.

"देवाच्या दारी उभा क्षणभरी" म्हणून सुद्धा किती बरे वाटते. देव अजून कुणी पहिला नाही हे खरे असले तरी देव अनुभवला तरी आहे. देव देवळात नाही, म्हणतो मात्र देव कुठेतरी आहे, हे नक्की असते. कष्ट करणाऱ्या व्यक्ती जवळ देव असतो. मानवता व सद्भावना मध्ये तो आढळतो. देव सत्य आहे कि कल्पना आहे सांगता येत नाही पण तो आहे

स्वेद गंगेच्या तीरी

जिथे राबती हात तेथे हरी

## 31 बंदा रुपया कि सुट्टे पैसे?

आराखडे चुकून, मी ओरखडे घेऊन, परतीच्या वाटेवर निघाले. जीवनाचा आराखडा, मी चांगला रेखला ,मात्र आयुष्यात मला अपयश मिळाले,

बेड थिंग्स हापण तो गुड पिपल ? असे म्हणून खेद करून, प्रश्न सुटत नसतो. खिश्यातील चिल्लर सुटे पैसे, खूळखुळावतान खिशाच्या त्या भोकातून ,फाटक्या प्यानटी तून ,घरंगळून गेलेला बंदा रुपया वेदना देतो. कुठे हि वशिल्याचा व गॉड फडरचा बंदा रुपया हाती नसल्याने, माझे सुट्टे पैसे डबीत पडून राहिले. चुकत चुकत शिकायचे ,ठरवल्यावर जे चुकले ते शिक्षण घेत गेले ,पण खच्चीकरण सुद्धा करीत गेले. आता माझी स्वप्ने सुद्धा म्हातारी झाली आहेत.

तक्रार पेट्यांना टाळायचे कसे? न बोलता गप्प बसलो तर? तोंडात जीव  नाही का म्हातारे? असे म्हणतात. न बोलण्याचा हक्क सुद्धा, प्रत्येकाला हवा ना? न बोलण्याचा का? बोलत का नाही तोंडात जीभ नाही का? म्हणून म्हणण्या एवढी हलकी मनोवृत्ती, हि लोक दाखवतात व या तक्रार पेट्या उजळ मिरवतात,

मै भी मुह में जबान रखता हु
ये तो पुछो के मुद्दा क्या ही?

एक कुत्रा भुंकला कि सगळेच भुंकायला लागतात. नकार घंटा वाजवायला खूप हिम्मत लागते. भातुकलीचा खेळ सुद्धा मोडताना वाईट वाटते. मग गाव बदलताना का वाटणार नाही?

बचा हो तो रोटी का टुकडा दिला दे
तुम्हारे ही तुमसे दुवा मांगते है



अशा प्रकारे देवाच्या दारी भिक मागत ,किती काळ राहायचे? छोट्या छोट्या गोष्टीचे दुःख केले, तर २ वर्ष संपणार कशी? उभारी येणार कशी? बंद्या रुपयाचे दुःख करून ,सुट्टे पैसे गंजून जात आहेत. बसचे तिकीट काढून, पुढे जायला सुद्धा हे सुट्टे पैसे पुरणार नाहीत. खूप पैसे होते, तेव्हा खिसा कापला गेला. थोडे पैसे होते ,तेव्हा गाडी चुकली ,अधिक पैसे जमलेच नाही. आणि दुसरी गाडी आलीच नाही. रस्ता बदलून वेगळया वाटेवर गेल्यावर कळले, सर्वच रस्ते चुकीचेच आहेत. पुढे जाणे शक्य नाही. असुरक्षिततेच्या दरडीने हि वाट अडवली आहे. बंदा रुपया/ सुट्टे पैसे, या ठिकाणी ,दोन्हीही उपयोगी पडणार नाहीत.

विदाऊट तिकिटाचा,दूरचा प्रवास कधीही  येईल, त्यापूर्वी मी जगणे शिकत वाट पाहते आहे.

# 32 पुणेरी वाडे

पुण्याची मिसळ,पुणेरी जोडे, पुण्याचे मस्तानी सरबत, अशा वेगवेगळया यादीत पुण्यातील वाडे हि सुधा एक प्रसिद्ध वास्तू आहे. प्रसिद्ध"शनिवार वाडा"पुण्याची शान आहे. इथूनच पुण्याच्या वाड्यांची व वाडे असलेल्या पुणे शहराची ओळख सुरु होते. मोठे अंगण, अंगणात झाडे, तुळशी वृंदावन, पुढे मुख्य वाडा, कौलारू छत, मोठे दिंडी दरवाजे, करकरणारी मोठी दारे, मध्ये चोर दरवाजा, कोरीव काम केलेले लाकडी खांब, विहीर, इतिहासाचा वारसा सांगणारी हवेली,वाडा नामक ती वास्तू असते.आत भिंतीवर लाकडी फ्रेम मध्ये वाड्याच्या, त्या मालकाचे किंवा मूळ पुरुषाचे छायाचित्र, मोठी झुंबरे, आत कोनाडे, उखळ, जाती, तांब्या पितळीची भांडी, अशी या वाड्यांची ओळख असते. पेशव्यांच्या राजवटीत १७४९ ते १८१८ सुंदर असलेल्या वास्तूंचे आता अवशेष उरले आहेत.

कसबा पेठेतील मुजुमदार वाडा, रास्ता पेठेतील रास्ते वाडा, नातू वाडा, शनिवार पेठेतील विश्रामबाग वाडा, सदाशिव पेठेतील भोरकर वाडा, नारायण पेठेतील दाते वाडा हरिभवन, महात्मा फुले वाडा, आताचे म्युझियम गणेश खिंडीतील गणेशवाडा, साईकृपा वाडा, सोमवार पेठ असे अनेक वाडे पुण्याचे भूषण होते. त्यातील काही अजूनही बाकी आहेत. रस्ता रुंदीकरणामुळे वाड्यांचे अंगण गेले. एकत्र कुटुंब टिकेना झाली आणि जुन्या पद्धतीचे वायरिंग उपयोगी नव्हते,पाण्याची तोकडी सोय यामुळे हे वाडे गैरसोयीचे झाले. हेरीटेज कॉरीडोर, म्हणून काही वाडे टीकले ,बाकी ठिकाणी उंच इमारती बांधून झाल्या. छोटे झरोके, लाकडी जिने, तुळया, कोरीवकाम, पुढे हौद, अंगण, तुळशी वृंदावन, हळू हळू एक एक चिरा निखळू लागला.



काही दिवसांनी तर स्मरणातच उरतील या आठवणी.

सोन्याच्या भावाने विकल्या जातात या वाड्याच्या जमिनी

पेन्शनरांचे पुणे भूतकाळात जमा झाले आहे.

हुक्का पार्लर व शेअर बाजाराची फ्याशन आली आहे.

बघता बघता हे शहर सिमेंटचे जंगल झाले

हिरव्या डोंगरांचे माथे पार उजाड झाले.

इतिहासाची साक्ष देणारा शनिवार वाडा

बाकी सगळे वाडे म्हणजे पैशासाठी तोडा पाडा

पुणेरी वाडा पुस्तकांत फोटो मध्ये उरला.

पुण्याचा पुणेरी बाणा बिल्डरांनी गिळला.

# 33 निसर्ग राजा

मी आज काही विचित्र प्रश्न विचारणार आहे.

वारा बघितलाय का?

कळ्या उमलताना एक आवाज येतो,

तो कुणी ऐकला आहे का?

शहरात रोजच्या धावपळीत आवाजांच्या गोंधळात तो आवाज दाबून जातो. सूर्य प्रकाशाच्या किरणात,आगदी थंडीत,पहाटे कोवळया किरणांना भेटण्याचा, आनंद वेगळाच असतो. प्रत्येक ऋतूत, अशी अागऴी भेट निसर्ग देतच असतो. उदा. गर्मीत वळवाचा पाऊस, झाडांशी मैत्री केली कि हिरवी ओली, सुगंधी मैत्री मिळते. त्या मैत्रीत, भेट देणारे पक्षी हि सामील होतात. कधी तरी गवताच्या हिरव्या तृण पात्यांवर किंवा हिरवळीवर पहुडण्यातील आनंद, आकाशात चालणाऱ्या हलणाऱ्या ढगांचे रूप बघणे,धबधब्याच्या तुषारांचा आवाजऐकणे,हे उत्तम मानसोपचार असतात. सावकाश, यथावकाश, निसर्ग काहीतरी देतो. सुर्य चंद्राची किरणे, थंड वाऱ्याची झुळूक, हिरवाईने नटलेली पृथ्वी, मुक्तपणे व मोफत निसर्ग अापणाला माया देतो. शेताच्या बांधावरून चालत जाताना निसर्ग राजाच्या ,चमत्काराने चकित न होणारा माणूस विरळाच म्हणायचा !

समाजा कडून, नात्यांमधून फसवणुकीने जर दुखावले गेलात तर निसर्गा सारखा मित्र नसतो. तो हळुवार फुंकर घालून तुम्हाला बरे करतो. शांत करतो, हजार हातानी कुरवाळून आई सारखी माया हि देतो.



ऊत्तरेत बर्फ पडताच पांढरी चादर ओढणारी पृथ्वी, पावसाच्या थेंबांची दुलई पांघर्णारी वसुंधरा सूर्यास्ताच्या वेळी सोने उधळणारी धरती ,कितीही वेळा बघा दरवेळी वेगळी वाटते. अन्न धान्य देणाऱ्या, या निसर्गातून माणसाला, अनेक औषधी वनस्पती मिळतात. मानवाच्या भाव भावनांवर ,परिणाम करण्याची शक्ती, निसर्गात असते. ढगाळ अंधाऱ्या वातावरणात, तिन्ही सांजेला व्याकूळ होणारे मन, सूर्योदयाचे वेळी, कळी प्रमाणे, कळी बरोबर उमलते.

सकाळचा सुर्य, रात्री दिसणारा चंद्र व चांदण्या, अगदी वेग वेगळे, रंग ढंग असतात. निसर्ग मानवाला खूप आनंद देतो. आपण पर्यावरणाचे रक्षण करून ,निसर्गाला मैत्रीचा हात द्यायला काय हरकत आहे? तळया काठच्यानी तळयाशी मैत्री राखायला हवी. निसर्ग राजा खुश राहील तरच आपण त्या राजाची प्रजा खुश राहू.

# 34 चांदण्यातील चंद्राची चाल

चंद्रताल, पालीव ,मड्डुमचा डोह, तलाव, डोह ,जलाशय अशा विविध नावानी प्रसिद्ध असा एखादा तरी तलाव प्रत्येकच गावी असतो. माणसांनी वस्ती करताना ती नदी किनारी किंवा त्या जलाशया काठी केलेली असते. वस्ती वाढली व दूरवर पसरली व तलाव गावाबाहेर राहिले. तरीहि खुषीसाठी,तलाव भेटीची इच्छा, नेहमीच माणसाला लागून राहते. धर्म शास्त्र नेहमीच जलाशयात दान करावे ,तिथे अर्घ्य द्यावे असे सांगतात.

घरात अंधार असला ,कि बाहेरचा प्रकाश आकर्षक वाटतो. मात्र बाहेरील प्रकाशात असुरक्षितता असते. घरातील तो व बाहेरील तो. वि.स.खांडेकरांच्या दोन मेघ प्रमाणे त्या दोघात फरक असतो. सिनेमांच्या चौकातील गर्दीतील नशा, नाती, फसवी असतात,तलावाजवऴ एक शांती असते.. पाण्यात उडी मारुन,पडल्यावर थोडावेळ बरे वाटते. मग आपण पाण्यात बुडतो, नाका तोंडात पाणी जाते. श्वास गुदमरतो. वेदनांचे मोहोळ उठते. पण त्याच वेळी कोणीतरी दैव नावाची अज्ञात शक्ती, हात देऊन वर ओढते. मरण येत नाही आणि वेदना सहन होत नाहीत. मेंदू पर्यंत पोहोचणार नाही, अशी वेदना जी सर्व पंचप्राणात मुरते. कधी बधिर होते, तर कधी शुद्धीत, वेदनांचा दंश सोसेनासा होतो.

तलावाकाठी भग्न देवऴे,राजांचे महाल आढऴतात. ईतिहासात,देवऴे का तोडली जावीत,राजाने शत्रूची माफी का मागावी? राणीने सत्यावर विश्वास ठेऊन,न्याय्य लढा का देऊ नये? भांडणे लढे संपतात. इतिहास उरतो. या इतिहासाच्या पाऊलखुणा दुखावतात. रागाच्या भरात जे काही अपशब्द बोलले जातात ,ते पुसता येत नाहीत. हळव्या व्यक्तींना ते गिळता येत नाहीत. दुष्टांचे लांगुलचालन करणारे



यशस्वी होऊ शकतात, होऊ देत, मात्र सज्जनांना सुद्धा विजयाची संधी मिळू देत. स्मृती दुबळया असतील तर विसरता येते, पण काही वेळा ,काही गोष्टी विसरता येत नाहीत. सत्याचा स्पर्श वेगळा असतो व स्वार्थाची भाषा निराळी असते. तडजोड करून वास्तवाशी जुळवून घेता येते. पण लढणाऱ्याला मात्र शहीद व्हावे लागते. मागे पडलेल्या नात्यांशी, हरलेल्या युद्धाची यादी मोठी होत जाते.

चांदण्यांना बघून खुषीत जाणाऱ्या ,चंद्राची चमचमत्या रंगाची वेगळी चाल मंद असते,प्रथमेला चंद्र हळू चालतो,पुढे गति वाढवतो,शान दाखवतोच. चंद्राला ग्रहण लागते तेव्हा?पण बिकट वाट जेव्हा येते तेव्हा? चांदण्यातील चंद्राची चाल, विकासाचा दर, अशा भ्रामक मिथ्या गोष्टींहून, जीवनसत्य वेगळेच असते.

जग बघा वाचा,

चंद्र विसरा,वास्तवात जगा

महात्मा गांधींचा चष्मा चोरीला गेला आहे.

# 35 भारद्वाजाचा शोध

हुक- हुक असा आवाज ऐकू आला, मी छत्री काढली, पायात रेनी बूट घातले आणि शेतातील चिखल तुडवत० त्याच्या आवाजाचे दिशेने,**भारद्वाज** शोधत, निघाले. गूढ काळोखावर प्रकाशाचे औक्षण चालू होते. मृग नक्षत्रावरचा, रिमझिम पाऊस झिरपत होता. बिनधास्तपणे आपल्याच नादात, तो हुकहुक ओरडत होता. झाडाच्या फांदीवर पाना आड लपायची, त्याला इच्छा नव्हती. टुणकन उड्या मारत तो हिरवळीवर येउन गवतात लपलेले, किडे खाऊ लागला. मंदगतीने क्याटवॉक करीत, तो मला न घाबरता चालत होता. त्याला बघूनच, मला खूप आनंद झाला आहे. हे जाणूनही तो शिष्ठपणे राजबिंडेपणाने गवतावर उड्या मारत होता. उतावळेपणा नव्हता. एक प्रकारचा आत्मविश्वास होता. जणू मला सांगत होता.

ये मेरा एटीट्युड है

तुम्हारा एटीट्युड तुम रखलो.

नवी कोरी वही जशी जून मध्ये ,जशी दिमाखात वावरते तसा तो भास मारत होता. तो शोधायला, माझी फाटकी वही घेऊन ,मी त्याच्या दर्शनाला उत्सुक होते. मी उगीचच भारद्वाज पक्षी नमस्कार- शुभ शुभ आशीर्वाद असे जोरात म्हणाले.

मी किंवा माझे अस्तित्व त्या भारद्वाज पक्षाच्या खिजगणतीत सुद्धा नव्हते.

बराच वेळ मी हा दर्शन सोहळा उपभोगला. मग त्याची जोडीदारीण झाडावरून, या पक्ष्याला आवाज देऊ लागली. तो उडून झाडावर बसला व दोघे समांतर रेषेत उडून दूर गेले. खरेतर भारद्वाज म्हणजे कावळया सारखाच दुसरा पक्षी असतो. फक्त सोनेरी, मातकट पंखांमुळे, त्याला सोन कावळा किंवा देव कावळा ठरतो.



कावळा, रोजच्याच ओळखीमुळे, अति परिचयात अवज्ञा ,होऊन दुर्लक्षित ठरतो, तर भारद्वाज भाव खाऊन जातो.

लाल डोळयांनी व सोनेरी पंखांनी ,तो हिरवळीवर वावरताना सुद्धा वेगळा दिसतो. जोडी जोडीने वावरून तो थव्यातल्या रानपाखरांपेक्षा वेगळेपण दाखवतो. काड्या काड्यांची घरटी सर्वच पक्षी बांधतात. भाराद्वाजाचे कुक्ुकुट कोंबा चे ,घरटे काड्यांचे ,तसेच घरटे असूनही खास वाटते.

भारद्वाज भोवतीचे शुभ असण्याचे, दर्शनाने मनोकामना पूर्ण होण्याचे, एक प्रकारचे सोनेरी वलय असते . कावळयाला भारद्वाज बनवतात हे सोनेरी पंख! परत एक काळा ठिपका दिसला, सोनेरी पंखांच्या अपेक्षेने ,मी चिखल तुडवू लागले. पण जवळ जाऊन पहिले ,तर तो कावळा निघाला. सोनेरी पंख दिसले नाही ,तर भारद्वाज पक्ष्याचा शोध व्यर्थच ठरतो.

सुखाचा शोध, शांतीचा शोध सुद्धा ,असा फसवा असतो का?

# 36 माझे इवलंस गाव

देह झाला मोगऱ्याचा, फुल चांदण्याचे व्हावे
चंद्र धरताना हाती. पाय मातीला लागावे
नात जीवाचं मातीशी तुला ठाऊक असावे
तुझ्या टपोऱ्या डोळयात माझ इवलंस गाव मावावे.

माझ्या छोट्याश्या कुटुंबात, इवल्याश्या गावात टिकलीएवढ्या तळ्याकाठी,मी खुश होते. ,माझे गाव हरवले, काही दुष्ट व्यक्तींनी, स्वार्थासाठी मला तिथून दूर केले. मानवाने भूतकाळात रमू नये म्हणतात. पण जखमांचा नासूर झाला, कि मला वेदनांच्या गावातील ते माझे इवलेस गाव, आठवत राहते.

अलिबाग तसे समुद्र किनाऱ्या साठी प्रसिद्ध आहे. मात्र अलिबागच्या पुढचे बेलकडे, खानाव, उसर हि छोटी गावे त्यांच्या निसर्ग रम्यतेने खुलतात. हिरवी शेते, बैलगाड्या, भात लावणारे शेतकरी, भारद्वाज पक्ष्यांच्या जोड्या,बुलबुल, साळुंक्या, खंडू पक्षी असे सोबती असतात. सोबत फुलांची रांगोळी हि असते.

निळया आकाशाचे हिरवे किनारे असे हिरवेगार दृश्य असते. बहिरीमातेचे मंदिर व नानासाहेब धर्माधिकारी यांच्या अध्यात्मिक संस््था ,अशा किनारीने, हा गावाचा हिरवा शेला अजूनच खुलतो.

शांतपणे व निरपेक्षपणे फुलणारा निसर्ग व साधीभोळी माणसे हे या गावाचे वैशिठ्य आहे ! हो छोटेसे माझे गाव उसर त्याचे नाव आहे.काही काळासाठी आले, बदली होऊन मी ह्या गावाहून लवकरच परत गेले. बघता बघता ते गाव मागे पडले.

रहनेको सदा दर मे, आता नही कोई
तुम जैसे गये, ऐसे भी जाता नही कोई
असे म्हणत ते गाव ,मला पुन्हा पुन्हा बोलावत राहते.



# 37 अपयशाचे यश

मनःशांती साठी हिमालयात जायची गरज नसते. मनाचे अंतर्गत सुव्यवस्थेसाठी आत बघा व बाहेरील जग हे परिघा बाहेर ठेवा. (हो उपदेश सोप्पाच असतो) काही दुखद घटना विसरल्याखेरीज पर्याय कुठे असतो. त्या विसरणे ,आपल्याच हिताचे असते. जीवनातील एखाद्या क्षणी कळते, काय मागे सोडायला हवे होते, काय धरायला हवे होते. कुणाला कितपत भाव द्यायचा आणि कुणाच्या शब्दांकडे दुर्लक्ष करायचे. तलवारीच्या घावांनी जखमी अवस्थेत सुद्धा, ह्या व्यक्तींना पुन्हा कसे टाळायचे किंवा त्या मनातून दूर कशा फेकून द्यायच्या हे कळते. त्याची नीती त्यांची वृत्ती, अस्वाभिमानी असेल तर नीती, तत्वज्ञांशी सुद्धा ते लोक तडजोड करतात. आपण नीतीला चिकटून आपली टांगतोडी सुद्धा गोड मानावी.

उन्हा तान्हात पल्ह्याट्या उपटताना

तळहाताच्या घट्यावर थांबूनच आहे गरिबी

भाकरी पेरून आम्हीच उपाशी राहायचे का?

विदड्रोल म्हणजे कोशात शिरणे हा पर्याय योग्य आहे का? कि हाच योग्य पर्याय आहे?कठोर सत्याची जाणीव हवी, पण स्वतःची वेदना मनाला जाळत ठेवणार असेल तर त्या जागेतून दूर जाणेच योग्य असते,निवडुंग जवऴ केला तर काटेच मिऴनार त्यमुऴे कठोर निर्णय घेतले. निसर्गाच्या सान्निध्यात आणि केवळ देह धर्मा इतकेच, देहरूप समजून, अलिप्त राहता यायला हवे. आलेले दुःख हे संधी मानावी का? अपयश हे ,कलेच्या दृष्टीने प्राप्त होणारे मोठं यश असते. अशक्य कोटीतील घटना जीवनात घडतात. त्यावेळी हि कला हा दर्द माणसाला साथ देते.

है सबसे मधुर वो गीत जिन्हे

हम दर्द के सूर मे गाते है

हळव्या मनात कला उमलते. अश्रूंची फुले होतात व वेदनामय हृदयातून ठिबकणारे रक्त, शब्द ,गीत, कला बनते. कलाकाराला रोजच्या जीवन संग्रामात, लढावे लागते पण तरीही त्यांनी कला जोपासावी आणि कलेच्या साथीने दुःख हलके करावे. अपयशातील यश हे असेच असते. खूप वेदना सोसल्या शिवाय बाळ जन्माला येत नही. नवनिर्मिती साठी उध्वस्त व्हावे लागते.

हि आवडते मज मनापासुनी कला
लाविते लळा हि जशी मुला- बाळा
वेदनांमध्ये असती, प्रसुतीच्या कळा



# 38 ओढणी

"इन्ही लोगोने ले छीना दुपट्टा मेरा", "अोढणी अोढके नाचू,अोढणी"
अशी अोढणी बद्दलची गाणी लोकप्रिय असतात

बाईने सत्यासाठी सक्त मजुरी स्वीकारली, तेव्हा एवढी मोठी किंमत द्यावी लागेल असे तिला कधीच वाटले नव्हते.तिची अोढणी खेचली गेली. व्हीसल्ब्लोअरचा खून, फुटलेले साक्षीदार, कलाटणी घेणारे तक्रारकर्ते,बलात्कारी, यापूर्वी आपण चित्रपटातच पहिले होते. हिंदी सिनेमात नायिका पुराव्याचे कागद, कॅसेट बंडल घेऊन, एखाद्या खास व्यक्तीकडे पोहोचते आणि त्याच्या हातात ते सोपवून म्हणते, "मला न्याय द्या" आणि अचानक तीच जवळची वाटणारी, नाटकी प्रर्वृतीची गोडबोली व्यक्ती,कायम तोंडात साखर ठेऊन वावरणारा तो आदर्श मानव, खिशातून पिस्तुल, चाकू, सुरा काढून नायिकेचा गेम करतो. तो सिनेमा व खोटी कथा असल्याने नायक येउन नायिकेला वाचवतो. प्रत्यक्षात मात्र अनेक नायिका, निर्भया धारातीर्थी पडतात.अोढणी घालवून बसतात.

स्त्रीची अब्रू म्हणजे कचकड्याचे भांडे, काचेचे भांडे वगैरे बालपणापासून ऐकले होते. चार इंचाच्या जिभेने तोंडी बदनामीने, हे अब्रूचे भांडे तडकवणे सोप्पे असते. "मुन्नी बदनाम हुई " हे खरेतर किती दुःखद असते. पण त्या वेदनेचे आयटेम सॉंग होतो.अशा नाचनार्या बायका व चीप पॉप्युलारीटी चघळणारे बघे सुद्धा खूप जमतात. त्यांना नायिकांच्या प्रश्नाशी त्यांना देणे घेणे नसते. निव्वळ करमणूक हवी असते. प्रश्न नायिकांना स्वतःच सोडवायचे असतात.

'लागा चुनरीमे दाग' ,मधील राणी मुखर्जी ,जेव्हा बदनाम होते किंवा पाकिजा मधील मीना कुमारी जेव्हा, 'इन्ही लोगोने ले छीना दुपट्टा मेरा' अशी तक्रार करते तेव्हा तो तिचा प्रश्न इतरांचा प्रश्न म्हणून समाज सोडून देतो. खिडकीतून बाहेरचा जग बघणारी मुलगी, बदनाम होत नाही, असे हि नसते. बंद खिडकीवर नजर ठेवणारे

विक्रुत हि असतातच. महिला शिक्षण, घेवून नोकरीसाठी घराबाहेर पडल्या आणि विकृतांना नेत्रसुख मिळू लागले. अशा आंबटशौकिनांच्या टोळया, इव्ह टीजिंग करू लागल्या. भारतीय इतिहासात महाराणी पद्मिनीचे दर्शन सुद्धा, राजाने, त्या कथित व्हिलन अल्लाउद्दिन खिलजीला, आरशात दिले होते. आता काळ बदलला व पद्मिनीला वखवखलेल्या नजरेने बघायला, अनेक आंबट शौकीन पुढे आले आहेत. लायकी नसलेले सुद्धा! असे विकृत त्यांच्या त्या नजरांनी, कामावर जाणाऱ्या महीलांना, घायाळ करीत राहतात. भारतीय चित्रपटांचे तर काय चालले आहे समजतच नाही .देह प्रदर्शन ,हिंसा बघुन रामा-रामा,देवा वाचव या देशातील बायका मुलिंना, असे म्हणावे लागते.शिक्षणासाठी, पगारासाठी बाहेर पडलेली, ती मुलगी, महीला आज बोचर्या नजरा भोगते आहे.विक्रुत अशा नजरा, कारण बेकारांची,असंस्क्रुतांची बिनकामी लोकांची लोकसंख्या वाढते आहे,संस्कार दुबळे ठरत आहेत, पैसा देव बनलाय.

पोर्नचा सुळसुळाट झालाय.पुरुष बदललाय,बायका बदलत आहेत·

इन्ही लोगोने ले छीना दुपट्टा मेरा!



## ३९ देऊळातील देव

अनेक देवळे पार करून अनेक अनवट वाटा तुडवल्यावर एका क्षणी मला वाटले कि, माझ्या मनात कुठेतरी एक नास्तिक लपलेला आहे. बऱ्याच जणांना देवाचा काही अनुभव आहे का? देव दिसला का? असे मी खात्री कुणालाच नव्हती. मी एका रात्री त्या नक्षत्रांना पुसते -

परमेश्वर नाही घोकत मम् मन बसले, मी अनेक समुद्र, नदी, आकाश, डोंगर, दऱ्या, सुखी क्षण, दुःखी क्षण सर्व देवाचे अस्तित्व जाणवते हे चाचपून पहिले. कधी हळवी होऊन चिडून गेले. जनविजन झाले, विठ्ठल नाम पाहे तिकडे माझे विठ्ठल आहे.

देव ज्यांना माहित नाही त्यांच्यासाठी देऊळ धर्म न उमजे त्यांच्या साठी शब्दांच्या संहिता.रा.वन चित्रपटात म्हटल्याप्रमाणे खलनायक शक्तिशाली असल्याने देव हरतो? माझ्यातील तत्वचिंतक देव शोधात राहतो, तर भोळा भाबडा मानव निराधार क्षणी देवाचाच आधार शोधून जखमेवर मलमपट्टी करा.

काही बोलायचे आहे पण बोलणार नाही,
देवळाच्या दरामध्ये भक्ती तोलणार नाही.
माझ्या अंतरात गंधक कल्प कुसुमांचा दाते
पण पाकळी तयाची कधी फुलणार नाही.

अगदी वृद्धांमध्ये आपल्यासोबतचे पुढे निघून गेले मात्र आपण मागे जिवंत राहिलो हा आनंद होता. तरुणांमध्ये भविष्याची स्वप्ने तर बालकांमध्ये निरागसता होती. देव कदाचित देवळात असावा. असे विचार बऱ्याच जणांमध्ये आढळेल. कर्म कांडांवर श्रद्धा ठेवणारे अनेक सुशिक्षित आढळले. प्रत्येकाची समाधी पूजा पद्धती नैवेद्य वेगळा. मानला तर देव, कराल ती पूजा, "पण देवा बद्दलची खात्री नाही"

शोधिसी मानव राऊळी मंदिरी,
नांदतो देव हा आपुल्या अंतरी"

हा विचार मानणारे कमी आहेत. अक्षरांचा सांग, मनाचे रंग वेगळे, पण भाव तोच होता. मूर्तिपूजन हताश मनाला दिलासा देणारा, लढताना शक्ती देणारा पुढे नेणारा असा देव निदान खोटी आशा म्हणून असावा असे वाटते.एकदा देवाला भक्त भेटले, देवळात का येता? या प्रश्नाचे निश्चित उत्तर माहित नव्हते कुणालाही. देव म्हणजे फिलगुड? देव म्हणजे तिसरा हात? देव म्हणजे मूर्ती, कठोर मित्र जे सांगायचे ते सांगणारा. देव म्हणजे साईबाबा, श्रद्धा आणि सबुरी, म्हणत असणारे. त्यांच्या त्या करुणभावां मध्ये आर्तता असते. जणू अगतिक ते वेगळंच संदेश देतात. जे घडते आहे ते मी दगडी शिळेवर बसून फक्त सत्य व असत्याचा न्याय व अन्यायाच्या या सह्यातीत, कठोरपणे बघत, मी अम्पायर म्हणून बसतो. शक्ती जशी बेटा तुझ्या कडे नाही तशी शक्ती माझ्याकडेही नाही. हे कलियुग आहे. असे ते साईबाबा सांगतात असे मला वाटते. तेंदु बागेतील धुनीत माझे मन जळते. देवळातील देव माझ्यासाठी बाहेर असतो. तो देवळातच राहतो आत्म मग्न!



# ४० मयूर पंख

" मयुरा रे फुलवीत ये रे पिसारा" या शब्दात कवी नेहमी मोराला बोलावतात.

"नाचणारे मोरा आंब्याच्या बनात" म्हणून नाचवतात. त्या मोराचा पिसारा मोरपिसारा, मयूर पंख - किती सुंदर शब्द आहे. आनंदाने बागडणाऱ्या त्या पावसाच्या थेंबाचा सडा पडताच खुश होऊन मयूर नृत्य करण्याऱ्या मोराचे पंख.

पंखा मध्ये उडण्याचा अर्थ समाविष्ट असतो. सुंदर नृत्य करणाऱ्या मोराला उडायला साथ देणारे पंख म्हणजे किती सुंदर आकर्षक असतील ना? उडणे सुंदर, पंख सुंदर, पाऊस हि सुंदर!

मोरपिसांचा सहस्त्र रेषा त्यालाच तो डोळा, मोरपंखी चकचकीत रंग न आवडणारी व्यक्तीत असणेच शक्य नाही. परमेश्वराच्या चित्राच्या आर्ट ग्यालरीतले मोनालिसा चित्र म्हणजे मोरपीस असावे. सर्वोकृष्ट , नाजूक, कलबुटीने रंगवलेले, तरीही बटबटीत न वाटणारे. "मोरनी, मैं तेरे बाग कि" म्हणत प्रेयसी आपले प्रेम व्यक्त करताना मयूरपंख नजरेत घेऊन बावरते. देवी सरस्वतीचे वाहन सुद्धा मोर आहे. आधी श्री गणपतीने आपले वाहन असलेला मोर पक्षी आपला भाऊ कार्तिकिय याला बक्षीस दिला आणि कार्तिकियाचे नाव मयुरेश्वर पडले. मयुरेश्वर नावात सुद्धा मयुरपक्षी व त्याच्या त्या नीलरंगाची झालर आहे. त्या भक्तीला मयूरपंख जोडलेले असतात. हि भाबड्या वयात, शाळेतील वह्या पुस्तकात आपण खूण म्हणून ठेवलेले मोरपीस आठवा. " त्या एका मोरपिसाचा दोन मोरपिसे होतात" हे मित्राने सांगितल्यावर आपण कितीवेळा ते दडवलेले मोरपीस पुन्हा पुन्हा चाचपले असेल, ते मोरपीस हरवल्यावर बालपण हि ह्यावरून जाते. मोराचे नृत्य बघताना वाटते, इंग्रजीतील मोर शब्द सुद्धा मराठीतल्या मोर शब्द वरूनच आला असावा. मोर त्याच्या पंखाचा पिसारा सजवून पावसात नाचतो. ते दृश्य बघून मन भरत नाही. पांढरा मोर सुद्धा अगदी रेअर पक्षी आहे. विरळाच आढळतो. त्याचे दर्शन अजून अजून (मोर) व्हावे

म्हणून त्याचे नाव मोर. राजे रजवाडे, आपल्या महालात मोर पाळतात. मोरपिसांचा छत्री चवरी ढाळण्यासाठीं वाऱ्याच्या पंख्यासाठी वापरतात. नृत्यांगना नृत्य करताना मोरपिसांचा पंखा हातात घेतात किंवा पाठीमागे लावतात. मोर असणे हे सर्वोत्तम अशा निसर्गाचे लक्षण असते. श्रीकृष्णाच्या मुकुटावर विराजमान होण्याचा मन अमर अक्षय मानतात. मात्र मयूर पंखाचे डोळे सुंदर असले तरीही या डोळ्यांनी तो बघू शकत नाही. मात्र हेच मयूरपंख आपल्याला सौदर्य दृष्टी देतात.

peacock is the sign of highly green ecosystem .



# ४१ गावाकडची माती

थोडेसे शहरापासून दूर अंतरावर गेले कि आकाशाचा रंग निळा असतो हे जाणवायला लागते. एरवी मुंबईच्या गर्दीत केविलवाणे वाटणारे बगळे सुद्धा स्मार्ट वाटतात. मुंबईतील बगळे म्हणजे मळकट कळकटच वाटतात. त्या उलट गावाकडील पांढरे शुभ्र बगळे पिवळी लिपस्टिक, सॉरी चोच मिरवत उडतात.

बगळयांची माळ फुले अजुनी अंबरात

भेट तुझी माझी स्मरशी सांग का मनात?

हे गाणे आठवते. ओठात असे मन हळवे होते. मुंबईत कृत्रिम गारवा निर्माण करता येतो. गाडीत ऑफिस मध्ये एसी असले तरीही गावाकडील ती वाऱ्याची झुळूक तो गवताचा ओला वास याची सर कशालाच येत नाही. संध्याकाळी त्या हिरव्या झाडांच्या मागे, तपकिरी डोंगरावर सोने शिंपडत घरी परतणारे सूर्यनारायण गावाकडे जसे भावतात तसे मुंबईत जाणवत पण नाहीत. गावाकडे सूर्यास्त नंतर संधीकाळात सर्वच संदिग्ध वाटते. मन कातर होते.

"दिन अभि पाणी में हो

रात अभि किनारे के करीब"

अशी ती स्थिती असते. मुंबईत रात्र अगदी धाडकन अंगावर येते. कृत्रिम दिव्यांचा चकचकाट असतो. पण रात्रीचा अंधार सुद्धा अधिकच गडद वाटतो. मुंबईच्या घरांना अंगणात नसते. त्यामुळे तुळशी वृंदावनाशी दिवा लावणाऱ्या आज्या, परवचा म्हणणारी मुले, दूर मंदिरात येणार घंटा नाद जाणवत सुद्धा नाही. घराघरांची सिनेमा थिएटर्स झालेली असतात. व रडारडीच्या त्या मालिका त्या घरात सिनेमा हॉल मध्ये चालू असतात. "दिवस कसा गेला" "काय गृहपाठ दिला" असे सुसंवाद काही अपवादात्मक घरातच ऐकू येतात. रात्र संपते.पण एखाद्या फ्लॅट मधून येणारे कर्कश्य असे ते दूरदर्शनचे किंवा अन्य आवाज समाप्त नाहीत. वीज गेली तर इन्व्हर्टरवर सुद्धा सिनेमे चालूच राहतात. 24 बाय 7 असे तेच ते दळण दळणारा तो टीव्ही

जीवनावश्यक गरज असते. गावाकडे आजोबा गोष्टी सांगतात. आजी अजूनही गरमागरम जेवण भरवते व देवाच्या आरत्या म्हणते. बालके सरस्वती मातेची वीणा वादिनीचीच आरती गातात. लक्ष्मी पूजनासाठी कष्ट प्रत्येकजण करतो. पण संस्कृतीची चौकट भेदून जात नाही. दारात चमेलीच्या वेळ आहे. मागील दारी कपिल गायीची दूध भरपूर आहे. घराच्या घरी गरम अशी अन्न शिजवणारी गृहिणी आहे. संध्याकाळी गोधुळीच्या वेळी गाई चरून घराकडे परतत आहेत. शेतात पाटाचे पाणी वाहते आहे. हिरवलीकडे डोलून गावकऱ्यांना "या बसा गुळपाणी घ्या" म्हणून त्यांचे व पाहुण्यांचे सुद्धा स्वागत करीत आहेत.

पिंपळाच्या पारावर वृद्ध बसून त्या शिळोप्याच्या गप्पा मारीत आहेत. बाजूच्या पाळावरून त्या चुलाण्यावर शिजणाऱ्या खिचडीचा वास येतो आहे. मी स्मरण रंजनात रमत घ्यायला आलेल्या यजमानांना विचारले, "गावाच्या मातीचा वास अजून येतो?" "जमिनीला सोन्याचे मोल आले आहे. जमिनी विकून श्रीमंत होण्याची चढाओढ आहे. वडिलोपार्जित पिढ्यानपिढ्या चालणारा धंदा बसला आहे. काहीजण शेतात कष्ट करत आहेत. आळशी लोक बसून राहतात. प्रत्येकजण टीव्ही वेडे, उच्चभ्रू, श्रीमंत ज्यांना परवडते असे गावाकडील लोक रोज शहरात जाऊन फेरी मारतात. गावकस व गावाकडच्या मातीची ओढ धुराळयाच्या मागे पुसत होऊ लागली आहे. शेती हा धंदा आता उरला आहे तो नावालाच. घरी-दारी सर्वत्र छोटीछोटी घरे झाडांचा पत्ताच नाही. डासांचे, घाणीचे साम्राज्य आहे. काही बाबत हळूहळू गाव व शहर यातील सीमा रेषा पुसत होऊ लागली आहे. कुठल्या काळातील गावाबद्दल बोलता म्याडम? तुम्हाला गावाच्या मातीची ओढ़ आहे.

चायनीज विकत मिळते आता गावातल्या रस्त्यावरही.

मोबाईल घेऊन फिरतात लहान मोठे घरीदारी

तो उत्तरला. मी चकित होऊन बघत बसले. माझ्या डोळयातील स्वप्नातील स्मरणरंजनातील गाव कुठे गेला? स्वप्नातून मी वास्तवात आले व एक मोठा उसासा सोडला. व बदललेला गाव बघू लागले, ओढ़ लावते जीवाला गावाकडची माती.



## 4२ हक्कांशी भांडतो आपण

हक्क हे आपल्याला जन्मदत्त अधिकाराने कायद्याने मिळायला हवे, पण मिळतात का?

वर्तमानपत्रात "सुखाशी भांडतो आपण" नावाच्या नाटकाची जाहिरात वाचली आणि मला नावाचे सुद्धा नवल वाटले. खरंच सुख कसे एखाद्या बक्षिसाच्या गिफ्ट बॉक्स मध्ये चंदेरी आवरणात बांधून त्यावर रेशमी रिबिनीचं बो बांधून यावे. आपण ते बक्षिस आनंदाने उत्सुकतेने उघडावे, त्यातला आनंद वेगळाच असतो.

हल्ली मात्र वर्षानुवर्षे सुखासाठी धडपड करावी लागते. त्या सुखाची वाट बघावी लागते. आणि खूप तरसल्यावर ते सुख येते, युद्ध जिंकल्यावर येते तशी थकावट घेऊन मिळालेले ते सुख मग उपचारा पुरतेच उरते. "सुखाशी भांडतो आपण" म्हणावे असेच ते सुख मिळवणे असते.

कलियुगात, बदलत्या काळात, वातावरणात सर्वत्र प्रदूषण भरलेले असताना सुख सहप्राप्य उरलेच नाही आहे. खूप लोकसंख्या मोठी असलेल्या या देशात माणसाला माणसाचे कौतुक नाही. मिळालेल्या यशापेक्षा अजून काहीतरी हवे म्हून धडपड करावी लागते व इतक्याच सुखाचे एवढे काय कौतुक? अशा शब्दांनी त्या सुखावर गालबोट लावले जाते. सुख अजून हवे. गाड्या दोन असल्या तर तिसरी हवी, घर सेकंड होम हवे, सहली वारंवार हव्या, शिवाय दुसऱ्यांच्या सुखाशी तुलना चालूच राहते.

आयुष्यभर हा सुखाचं शोध सुखाची तुलना चालूच राहते. भला उसकी साडी मेरी साडी से सफेद कैसे? असे म्हणणाऱ्या बायकां प्रमाणे हेवे दावे, अहंकाराची टक्कर

कधीच संपत नाही. माणूस म्हटलं कि ते एक गन कमी व अवगुण जास्ती असेच गाठोडे असते. तरुण वय, धावपळ, विकारी भावना, यात संपते. कायमच दुसऱ्याच्या सुखाचा हेवा वाटतो, मनाचे खोटे समाधान करून व खरं दाखवूनही आतला सल उरतोच. सुखाशी भांडतो आपण.

हक्कांसाठी लढतो आपण

युद्धच जणू हे रात्रंदिन! अगदी मृत्यूचे स्वर्गद्वार दिसेल तेव्हा फक्त हा लढा संपतो.

तीर्थाटन करीत पोचलो नकळत शेवट तव दारी

अन तुझिया दारी गवसली मम् हक्काची तीर्थे सारी



## ४३ आहे मजा जगण्यात या

सुखाचा शोध, सुखी माणसाचा सादर, अशा कथा आपण नेहमीच ऐकतो. मी सुखी आहे ते रोज दहा वेळा लिहा म्हणजे तुम्ही सुखी व्हाल असा हि सल्ला ऐकतो. मात्र सुख हे फसवेगिरी करीत राहते. बऱ्याच काळ दुखी राहिल्यावर मी एकदा एका क्षणी सुखी व्हायचा निश्चय केला. कदाचित तो चुकीचा निर्णय माझी त्या काळाची काही अंशी गरज होती.

माझ्यातील ती कित्येक वर्ष त्या स्लो पॉयझनिंग मध्ये गुदमरत होती.

तू जशी तू अशी

तू फुलात मी पानात

मन जाईच्या कळयात

अशी गाणी आठवूं मला नेहमीच जुन्या खुणा शोधण्याची घाई झालेली असे. हातात हात तिचा, हात्तिच्याच (सहज) यावा असा सौम्य संदेश मनात येई मात्र विरून जाई. छोट्या पडद्यावरच्या त्या खोट्या पडद्यात मी उगीचच वेळ घालवत असे.

फुलांनी फुलायचे, कळयांनी हसायचे असे हे प्रत्येक क्षणाचे थेंब कधी सुकून गेले कळलंच नाही. घड्याळाचे काटे दोन असतात कारण माणूस दोन पायानी धावत असतो.

एका अपघातानंतर माझ्यातील ती मी जागी झाले. वाढत्या वयाबरोबर मला संगणक शिकणे, रॅट रेस मध्ये धावणे जमणार नाही हे मी जाणले. टॅप आल्यामुळे मी घरी आजारी झोपले होते. ऑफिसची कामे फोनवरून केली जातो होती. घराच्या सर्वांना त्यांची त्यांची कामे होती. पोटात भूक मी म्हणत होती. तापाने हातपाय चालत नव्हते. पाठदुखी पाठ सोडत नव्हती. ऑफिसचे काम पाठी लागले होते. मी आजारपणात सुद्धा मेहनत करीत होते. मला औषधांनी ग्लानी अली.

मोबाईल वाजला, मला स्वप्नात यमराज दिसले, ते म्हणाले,

"मी तुला न्यायला आलो आहे. 24 तास बाकी आहेत. तुझ्या आयुष्याचे. काय करायचे ते करून घे" मी मोबाईल बंद केला, लाडक्या मैत्रिणीला फोन केला. मुलासाठी गरम चहा करून स्वतःसुद्धा प्याले. अल्केमिस्ट या माझ्या लाडक्या पुस्तकांची पाने उलटत यमराजाची वाट पाहू लागले. यमराज आले नाहीत. कंदाची रॉंग नंबर असावा. त्या क्षणापासून एक सकारात्मकता माझ्यात आली.

फुलण्याचे दिवस परत आले आहेत.
आहे मजा जगण्यात या.
रोजचा दिवस आनंदाने जगणे किंवा आहे त्यात आनंद मानाने म्हणजे सकारात्मकता होय. एक राहते घर असताना वीक एन्ड घर हवे, एक गाडी असताना दुसरी हवी, सहली हव्या यातून मी अलिप्त झाले.

एका कवितेत कवीने म्हटल्याप्रमाणे  निशब्द संध्याकाळ होती ती

आकाश फिकटल्या ताऱ्यांचे झाले होते.
वेलींची कुजबुज नव्हती कि पानांचे हितगुज नव्हते.
यमराजांचा कॉल पुन्हा आला, यमराज म्हणाले, "तुला मी त्या दिवशी नेले पण ते त्या पहिल्या कुत्तरओढीच्या धावपळीच्या जन्मातून उचलले, हा नवा जन्म आहे. "मधुमास" नसतानाही मधुरमास वाटत होता. म्हणजे यमराज मला न्यायला आले नव्हते तर. निवृत्ती कधीतरी घ्यावीच लागते. हि निवृत्ती स्वतःसाठीच असते. हे सांगायला यमराज समोर दिसावे लागतात. खूप समोर स्पष्टपणे यमराज दिसले कि जगण्याची मौज कळू लागते. जीवनाची किंमत मृत्यूचं समजावून सांगतो.

यमराज पुढे म्हणले, येईन पुन्हा कधी तरी तो पर्यंत जीवन जग, केवळ कसेबसे  जिवंत राहू नकोस"

आहे मजा जगण्यात या.



# ४४ उगवता सूर्य

जन्माला उगवत्या सूर्याची उपमा दिली तर सकाळ माध्यान्ह संध्याकाळ अशा जीवनाच्या तीन अवस्था, बालपण, तरुणपण, व वृद्धावस्था होय. पण त्याचा काळ मात्र बदलतो. कधी प्रास्ताविक उगीचच लांबावे तसे. बालपण लांबते तर कधी तरुणपणाच्या झुळझुळत्या झऱ्याचे गाणे मंजुळवाणीत गवे तसे तरुणपण खुशनुमा असते. सुंदर झाडे, गाणी गाणारी पाखरे असे तरुणपण पटकन खुशीत संपते.

उतारवय मात्र रेंगाळते, शरीराची साथ मिळेना झाल्याने हळूहळू कुठल्यातरी काठीच्या आधाराने कसेतरी ढकलले जाते. एक समाज आलेली असते. पैलतीर दिसू लागलेला असतो. त्यामुळे त्या तिरप्या उन्हात सावल्या मोठ्या वाटू लागतात. डोळयात मोतिबिंदू आल्यामुळे किंवा मोतीबिंदू येऊनही जीवनाचे महत्व स्पष्ट दिसू लागते. सूर्य नारायण नित्य नेमाने उगवावा, अंधाराच्या दारी प्रकाश पाठवा. उगवत्या सूर्याला सर्वच नमस्कार करतात. मावलीचा सूर्य आवडत नाही असे नाही, पण उगवत्या सूर्यात ऊर्जा असते. प्रसन्नता देण्याची शक्ती असते. अभावाचे, आजीवन जगणाऱ्या दगड धोंड्याना सुवर्णमय करण्याची शक्ती सूर्यात असते. मी असे सांगतेय म्हणून, "अलिबाग से आएला समझा है क्या?" म्हणून टाळू नका. सूर्य हा सर्व विश्वाचा केंद्रबिंदू आहे व ऊर्जेचा स्रोत आहे.

आज निसर्गातील सर्व नैसर्गिक ऊर्जेचे स्रोत वापरण्याची वेळी अली आहे. वाऱ्यापासून चालणाऱ्या पवचक्क्या, सूर्यचुली, व नैसर्गिक वातानूकुलीनता देणारी यंत्रे, जलयंत्रे वापरायला हवीत.

निसर्गसुद्धा माणसाला किती भरभरून देतो, फुले, फळे, याची ती टोपली, शुद्ध हवा, निर्मल पाणी तो परमेश्वर निसर्गाच्या हाती मुक्त हस्ते देतो.

नाही थकवा, कंटाळा नाही

इतुकी माया कोठेची नाही

सोनेरी सूर्यकिरण जमिनीवर पसरवत तो सूर्याचा तप्त लालजर्द गोळा रोजच उगवतो. पण कंटाळा करीत नाही. नवीन आशा घेऊन येतो. नवीन आशा देऊन जातो जगण्यासाठी

किती सुंदर आहे हि सकाळ
देवा दया तुझी हि शुद्ध दैव लीला
लागो ना दृष्ट माझी माझ्याच वैभवाला
नमस्कार माझा उगवत्या सूर्याला.



# ४५ हसरतों के दाग

यु हसरतोंके दाग मुहब्बत में धो लिए
खुद दिल से दिल की बात कही, और रो लिए|
चाळीस वर्षांपूर्वी गाजलेली हि गझल आज पुन्हा एकदा चर्चेत आली आहे.
जो मिलकर खो जाती है जिंदगी में
उसे मुहब्बत कहते है
जो छूकर भी पायी नहीं जाती
उसे ग़ज़ल कहते है

त्यामुळे हि गझल तशी सामान्यांच्या डोक्यावरूनच जाणारी आहे. "तुम अगर मेरी नाही तो सकती तो किसी और कि भी नहीं हो सकती" असे किंचाळणारा हिरो, तोकड्या कपड्यात वावरून शोभेची बाहुली वाटणारी हेरॉईन त्यांचे ते उथळ वागणे, झाडांभोवती लपंडाव खेळणे,डिस्कोत नाचणे, यावरून तरी मुहब्बत म्हणजे काय? हे कळण्या इतपत ते प्रेमिक प्रगल्भ वाटतच नाहीत. त्यांच्या वागण्यातच गन्दी हसरतेच हसरते दिसतात. उगीचच अँग्री यंग म्यान म्हणून कालिख घेत सर्वत्र मारामाऱ्या मधला अजून थोडा मसाला म्हणून टाकलेले जवळीकतेचे काही सिन म्हणजे मुहब्बत असे प्रेक्षकांना समजायचे असते.

आंबट शौकीन लोकांसाठी तर मुहब्बत (अशी) पर्वणी असलेलेही उथळ चितपट निघतात. मग मुहब्बत कशाला म्हणायचे? हसरत?ज्याच्याशी एकनिष्ठ राहणे व त्याने राहावे हि अपेक्षा करणे- हसरत संसार करणे- हसरत

या सगळयांना हसरत म्हणायचे आणि एकमेकांकडून कुठलीही अपेक्षा न करता वेगळया वाटेने जायचे हे प्रेमाचे रूप अनोखे व आगळे असते. शिवाय गायिका पुढे कबुलीच देते. लता दीदींच्या आवाजात बघा

घर से चले थे हम तो ख़ुशी की तलाश में
गम राहमें खड़े वही साथ हो लिए
मुरजा चूका है दिल मगर ये फूल ही तो है
अब आपकी मर्जी इसे पतों में तो लिए

आजच्या लिव्ह इन रिलेशनशिप च्या जमान्यात हसरतोके दाग मुहब्बत मी धो लिये कसे समजावून स्पष्ट करून सांगायचे ? खुद्द दिल से दिल कि बात काही और रो लिये. हसरते शाहिद हुई

हसरतो के दाग?



# ४६ नाते संबंध

आदर्श असे नातेसंबंध सुखद असतात मात्र ते टिकवणे अवघड असते. जगातील सर्व साहित्याचा गाभा नाते संबंध हाच असतो. हि नाती माणसा माणसातील असतील किंवा मानवेतर पाळीवप्राणी पक्षी किंवा वस्तू या सोबतची असतील. पण कथानके नेहमी या गूढ नात्यांभोवती गुंफलेली असतात. विवाहबाह्य संबंधाबद्दलच्या कथा हिट जातात. हल्ली कुटुंबीय, दिवाळीच्या दिवशी साधारणपणे एकत्र घरी जमतात. अजूनही तो सण आपले महत्व टिकवून आहे. त्या दिवाळी पाडव्याला वडिलांनी सुचवले कि आपण नदीकाठी फिरायला जाऊ या. गाव बघायला आलेले भावाचे मित्र निघाले, वाहिनी हि निघाली. खूपच थंडी होती. काही गावकरी खेकडे पकडत होते. बिळात हात घालून त्यांचे खेकडे शोधणे चालू होते. बाजूला उंच गावात वाढलेले होते. काही मित्र उगीचच शहाणपणा दाखवणारे पक्षी मारत होते. बेडकांचा एक थवा पाण्याभोवती क्वाक क्वाक आवाज करीत फिरत होता. आपापल्या मैत्रिणींसह आलेले भावाचे मित्र त्या वातावरणाने भारले होते. व वाढलेली पोट सांभाळून दुडक्या चालीने पळत होते. घरातल्या प्रश्ना मुळे फिरण्याची उभारी माझ्या वडिलांना नव्हती. मात्र तरीही ते नाराजी दाखवत नव्हते. वडिलांचे वय बघता ते अजून जास्ती वर्ष माझ्यासोबत राहू शकतील किंबहुना जगतील असे वाटत नव्हते. त्यांना चालताना धाप लागत होती. माझा भाऊ आशावादी होता. म्हणजे वडील जगले तरी ठीक नाहीतर सर्व मालमत्ता विकून परदेशी जाण्याचा मार्ग त्याच्यापुढे होता. त्याची पत्नी हि टाळा सोबत घेऊन परदेशी जाण्यास उत्सुक होती. नाईलाजानेच, घरावरचा हक्क जाऊ नये म्हणून ते गावी येत असत. वडिलांशी त्याने नटे जवळजवळ तोडलेच होते. फक्त त्यांचे मित्र आले कि त्यांना गाव, वाडा, निसर्ग दाखवायला तो सहल म्हणून घेऊन येई. नदीकाठी फिरत फिरत भाऊ दूरवर गेला. त्याचे मित्र मागे रेंगाळले आणि भाऊ सापडेना झाला. त्या मड्डुमच्या डोहावर हिरवळ होती. कुरणावर बकऱ्या चरत होत्या. पाण्यात भोवरे होते. भीतीदायक प्रकारे पाणी दही दिशांनी वाहून येत होते. आकाशात पक्षी विचित्र आवाज करीत होते. फुलांच्या मंद सुगंधात एक विचित्र वास येत होता. मानवी नाती उमलेना तशी फुलेही रुसली आहेत.

नातेसंबंध हा एक गुंता गुंतीचा प्रश्न उरला आहे असे वडील नेहमीच म्हणत. आज त्याच्या डोळयात तेच भाव होते.

वाहताना बघून धडकी भरत होती. भाऊ पाण्यात वाहून गेला नसेल ना? ओढा नाले, भरून वाहत होते. अर्धातास वाट बघून आम्ही हिरमुसून परत आमच्या घरी जायला निघालो. घराजवळच्या कोपऱ्यावर एका नोकराला आम्ही नदी नाल्या काठी जाऊन भावाला शोधण्याची विनंती केली.

नदीकाठी बरेच गावकरी जमले. शोधाशोध करूनही भाऊ सापडला नाही. रात्र वर चढली.सर्वजण टेन्शन मध्ये होते. उगीचच प्रश्न नको प्रॉब्लेम नको म्हणून पहाटेच्या गाडीने भावाचे मित्र पुन्हा त्यांच्या घरी मुंबईला पळून गेले. हे मित्र! मी व वडील रडत होतो पण ते मित्र हळूच सटकले. सकाळी, लोक जमले, वाहिनी रडू लागली. हे जुने घर अपशकुनी आहे विका आणि चला मुंबईला" ती म्हणाली. मृत्यू भीतीत दुपारी बारा वाजले, अचानक भाऊ परत आला. त्याला टॅप चढला होता.

अंगाला थोडे खरचटले होते. त्याने सांगितले, कि तो पाण्यात धपकन पडला मात्र कुणीतरी त्याला उचलून पलीकडच्या तटावर उंचावर नेले. रात्र पडल्यावर ते लोक घरी गेले व त्याला रस्ता सापडेना. सर्वांना हरवलेली वस्तू परत मिळाली, मात्र मित्रांची पात्रता कळली..

हरवलेली व्यक्ती परत आली. आमचा ताण निवळला.

वस्तू हरवल्यावर व "ती" परत मिळाल्यावर तिची किंमत कळते. नातेसंबंधांचे असेच असते. री -री करत आपण ते बिढार बुद्धीच्या खटला प्रमाणे ओढत राहतो. तेव्हा त्याची किंमत कळत नाही. मात्र विरहानंतर त्या नात्याची समज अधिक प्रगल्भ होते. पैसे नसतानाही खरे मित्र असले तर, दिवस आनंदी जातात. आनंद मनात असतो, हॉटेलात जेवणात नसतो. संकट काळी मित्र मैत्रिणीशी प्रामाणिक राहायला हवे. राग व्यक्त करायला ती नात्यातील व्यक्ती वापरणे हि चूक बरेच जण करतात. राग लोभ व्यक्त करायची पंचिंग बॅग म्हणजे मित्र ? खर्च करताना देखील माणसाने आपली ऐपत बघायची, मित्रांची नव्हे. कठीण समय येता कोण कामासी येतो? चांगले माणूस नशिबानेच भेटते, ते टिकवायचे प्रयत्न आपण करावे. नात्या बद्दल अर्थात हे नियम सामान्यतः लागू आहेत. विचित्र विक्षिप्त व अपवादी व्यक्ती समुपदेशन कक्षेच्या बाहेर असतात.



11 ऑक्टोबर हा मानसिक आरोग्य दिन मानला जातो. त्या मानसिक आरोग्य दिनाच्या शुभेच्छा. नटे टिकवण्या साठी काय करायचे? मैत्री व नातेसंबंध जोडण्याची व नाते टिकवण्याची सवय ठेवा. महिन्यातून एकदा फोन, वर्षातून दोनदा शुभेच्छा, वर्षातून एकदा भेट नाते घट्ट होते.

हॅप्पी फ्रेंडशिप डे

# ४७ स्त्री स्वातंत्र्यम

स्त्री असुरक्षितच असते. भ्रामक वल्गनेने मी मुक्त म्हणणार्यांनी कधी कोष सोडलेलाच नसतो. प्रत्येक विचार एक प्रार्थना असते. व देव तथास्तु म्हणून ती इच्छा पूर्ण करतो. आपले मानाचं जणू त्या इच्छेला साद घालते. त्यामुळेच लिहतानाची भीती स्त्रीत्वाची असुरक्षितता पाठलाग करीत राहिली. जीवन म्हणजे यात्रा असते. पण भक्ती मात्र नसते. स्त्रीला सन्मान का नसावा? कोषाबाहेर ती इतकी असुरक्षित?

आजची कन्या होतीस तू उद्याची माऊली
माझ्या वृद्ध मातेची लाडकी लाडली
तुझ्यावर धरायला हवी हिरवी सावली
तुला दुखावून क्षुद्रांनी छाती फुगलेली
आमच्या मुळे व्यथित देवी माऊली
वसुंदरेची काया वेदनेने थरारली
माफी मागावी हात जोडून मुली
समाजाची तुझ्या बाबतीत दृष्टी चुकली
खरेतर ना बोलून तू आमची लाज राखली.

भूतकाळाच्या काही वेदना ठसठसतात व सूड घ्यावासा वाटतो. त्याच वेळी दुसरे मन सांगते सूड नको न्याय हवा. मग हळू हळू आपण न्यूट्रल होतो व आपापल्या मार्गावर चालतो. कुत्रा चावल्यावर कुत्र्याची भीती वाटावी तसेच काहीसे मला पर्यटना बद्दल वाटते. जगन्नाथ पुरीला आईला हृदय विकाराचा झटका आला व आई वारली, तेव्हा पासून मी कधी पर्यटनाला गेले नाही. वर्तमानाला लागून येणाऱ्या भूतकाळाच्या आठवणी कधी बालपणात नेतात तर कधी त्या एकाकीपणात ! तो क्षण मनात गारठूनच बसलेला असतो. त्या त्या वेळ परक्या ठिकाणी जसे जमेल तसे वागून वेळ काढला, पण त्यामुळेच समुद्र पर्यटनाशी माझी निगेटिव्ह फिलिंग जोडली गेली. स्त्रीत्व नको वाटते. स्त्रीला जीवन पर्यटनाला जायला शारीरिक शक्ती हवी व उगीचच



चड्डी बनियान छाप टूर्सवाले हालच करतात. व थोडे पैसे वाचवून आपण आपल्या जवळच्या व्यक्तीच्या आरोग्याशी व आपल्या आयुष्याशी खेळ करतो. असेच मला वाटते. संताप करून उपयोग नव्हता. थोडी चिडचिड कंटाळा, संतापाचा उद्रेक, होणारे सहप्रवासी होते, पण पर्याय कुठे होता. महिलांसाठी या देशात स्वछता गृहे सुद्धा पुरेशी नाहीत.

आंबट शौकीन संधिसाधूंचे प्रमाण सभ्य पुरुषांच्या अनेक पट आहे. एकाकी मुलींचे अनुभव ऐकून त्या असुरक्षिततेचि भीती वाटते. कुटुंब, न्यायालये, स्त्री हक्क संरक्षण समितीचे ऑफिस, व पत्रकारितेतील अनुभव लक्षात घेता, स्त्री बद्दलच्या दृष्टिकोनाला चित्रपट जबाबदार असावेसे वाटते. स्त्री करियरसाठी बाहेर पडून अधिक असुरक्षित झाली. कोषाबाहेर पडून तिचे फुलपाखरी पंख अधिक आकर्षक झाले. मात्र पाखरे पकडायचे जाळे व सापळेही वाढले.

जीवन म्हणजे येणे, राहणे जाणे,
कधी गुंतणे कधी डाव मोडून जाणे
एकवीस अपेक्षित सोडवून, डिग्री परीक्षा पास झाले,
कसे जगावे नाही कळले. पाठ्य पुस्तकांच्या पानामध्ये
वानवाच होती जगामध्ये धाडस शिवणाऱ्या शाळांची
मांदियाळी मतलबी पैसे काढू, बिळात लपणाऱ्या स्नेह्यांची
फसवणार्यांना मागे टाकून, डोळे पुसत पुढे पुढे जाणे
आव्हानांना तोंड देत ठेच खात करायचे संधीचे सोने
वाळवंटांवर धाय मोकलून मन खंबीर होते म्हणे
देव दोतो आशीर्वाद माणूस मात्र लाजिरवाणे
संस्कारांच्या शिदोरीवर खणखणते आपुले नाणे.
सोडून गेलेले सोबती तेव्हा उधळती स्तृतीसुमने
फायद्याच्या गुळाच्या ढेपेपाशी लबाडीचे लाळ गाळणे
यशस्वी झाल्यावर मात्र येते घेऊन फुलपाने
स्त्री म्हणून जगताना कोषातून हे उमलणे

न स्त्री स्वातंत्रम अर्हती हे मनूने स्त्रीला नव्हे तर पुरुषाला उद्देशून म्हटले असावे. कि हे पुरुषा तुला स्त्रीला त्रास देण्याचे हे स्वातंत्र्य योग्य नाही.

# ४८ बॉबिलॉन

भाषा अभावाचे असणे हे एक जागतिक सत्य आहे. भाषा न समजून अनेक गैरसमज होतात व दुभाष्या मार्फत संवाद आवश्यक ठरतो. बॉबिलॉन बेबेल नावाचा एक मासा असतो. तो कानात ठेवला कि समोर असलेली व्यक्ती कोणत्याही भाषेत बोलत असली तरी त्याचा अर्थ आपल्याला समजतो किंवा आपल्या भाषेत ते विचार अनुवादित होतात. चार्ल्स बेबेले या लेखकाची बॉबिलॉन मासा हि कल्पनाच आहे. प्रत्यक्षात असे कोणतेही सयंत्र नाही, जे सर्व भाषा एकाच स्तरावर सर्वांना समजावून सांगेल. त्यामुळेच संवाद साधणे अवघड जाते.

1. समोरची व्यक्ती काय बोलते हे कळत नाही.
2. शब्द समजतात पण अर्थ कळत नाही.
3. विचारांची तीव्रता समाजात नाही.
4. अर्थाचे अनर्थ होतात.

थोड्या फार फरकाने मानवी संवादांची साखळी अशीच असते. कळते पण वळत नाही. किंवा काळातच नाही. संवाद साधू ना शकण्याची कारण काही असो संवाद होत नाही हे सत्य आहे.

कितीतरी लोक असे असतात, जे काहीही काम करती नाहीत. त्यांना नीट काही कळत नाही पण ते यशस्वी होतात. त्यांना वेगळया संवादाची गरज नसते, उलट सर्व काही असून कष्ट करून काही विसंवादी ठरतात. पिशव्या, गाठोडे, फाईल सामान डबे बाटल्या पिशवीत भारावून अगदी मुहूर्तावर प्रस्थान ठेवावे तसे सामान भरून मी प्रस्थान ठेवत होते, चकपक छान ब्यागा, नटत थटत चाकावली ब्याग ओढत थाटात होणे मला जमलेच नाही. अभावाचे जिणे माझ्यावर ऐच्छिकपणेच लादले गेले होते. व मी बॉबिलॉन माशाचा म्हणजे मानवी संबंधातील त्या भावभावनांच्या गुंतागुंतीचा शोध घेत होते. एखादी झकपक व्यक्ती तशी सहजगत्या यशस्वी होऊ शकते. बेबेल नावाच्या चित्रपटात व तशाच एका दुसऱ्या चित्रपटात भाषा न समजल्याने एक



कुटुंबीय हेर ठरवले जाते, प्रत्यक्षात ते हेर नसतात. हेर ठरवले गेले कुटुंब व ठरवणारे कुटुंब दोघेही आपापल्या तान्ह्या मुलांना जवळ घेऊन रडताना आपल्याला कळते बॉबिलॉन अस्तित्वात असता तर? माझ्या ह्या संशोधनात मला असे आढळले कि जगात मानवी मनाचे संबंध सर्वत्र, सर्व देशात सारखेच असतात. सर्व सुखे असूनही अभावाचे असणे सोसणारी काही माणसे सर्वच प्रांतात व राज्यात असतात व रक्ताचा रंग सर्वच माणसांचा लालच असतो. बॉबिलिन मासा अस्तित्वात आला तर हे संबंध अजून स्पष्ट करता येतील.

प्रत्येकच व्यक्तीला आपली बोलीभाषा आवडते. आपल्या बोलीभाषेत बोलणारी व्यक्ती जवळची वाटते. मोबाईलवर बोलणारे जवळच्या व्यक्तीशी बोलण्यापेक्षा दूरभाष पसंत करतात. भाषेची तुलना इतरांच्या भाषेशी करताना काही मुद्दे विचारात घेता येतात.

1. सोप्पेपणा
2. उच्चार
3. भाषेतील ज्ञान माहिती
4. भाषेची ताकद व कमतरता
5. भाषा शिकतानाच ध्येय
6. ती भाषा विश्वव्यापी आहे का व ती शिकायला किती वेळ लागतो.
7. भाषेतील शिक्षण पूर्ण झाले हे कधी समजायचे.

जगातील सर्व भाषांचे वाङःमय एकत्रित होण्याच्या दृष्टीने सर्वांना समजेल अशी एकाच भाषा असणे आवश्यक आहे. मराठीचा, आपल्या मातृभाषेचा अभिमान आहेच. पण विश्ववापकतेसाठी इंग्रजीही शिकायलाच हवी. भाषांतरित साहित्यही वाचायला हवे. व चेहर्या वरील हावभाव नीट निरखायला हवे. बेबलॉन मासा सापडेपर्यंत त्याला पर्याय नाही. कारण संवादासाठी भाषा हेच बिनचूक माध्यम आहे.

# ४९ विक्रम कि वेताळ?

विक्रम आणि वेताळ ची गोष्ट आपण चांदोबा हे बालपणीचे पुस्तक जेव्हा वाचतो तेव्हा पासून आठवतो. विक्रम हट्ट सोडत नाही आणि वेताळी सोडत नाही. "वेताळा, काय म्हणून तुज कैसे जाणावा बाबा" असे म्हणून विक्रम झाडावर उलट्या लटकणाऱ्या वेताळाचे प्रेत घेऊन जातो. विक्रम व वेताळ दोघेही हट्टी, एकमेकांच्या बुद्धीची परीक्षा घेतात. राजाला प्रश्न विचारून निरुत्तर करणाऱ्या विक्रमला आपण बोलू नये हे का कळत नाही? खरेतर विक्रम राजा असतो वेळात हि तर अतींद्रिय अशी कल्पनाच असते. कि एका व्यक्तीची ती दोन रूपे असतात. बोलू नये कळत असतानाही बोलणारा (विक्रम) ई टीव्ही वरील हाय टेन्शन मध्ये, लोकसत्ताच्या तंबी दुराईच्या रफूल एक हाफ मध्ये व चांदोबाच्या अनेक अंकांमध्ये विक्रम व वेताळाचा उल्लेख असतो. प्रश्न वेताळ विचारतो. मग उत्तर तर द्यायलाच हवे, मौन कसे राखणार? अबोल भाषा कुठून येणार? नशीब आणि दुर्दैव याची विक्रम व वेताळ हि प्रतीके असतील का? लक अँड कोइन्सीडन्स या दोन महत्वाच्या टप्प्यावरूनच आयुष्यात यश मिळते. सक्सेस इज अ चान्स अँड पीस इज अ कोइन्सीडन्स हे एक जागतिक सत्य आहे. "सत्य " या शब्दालाही हल्ली वेगळाच वास येतो आणि मनातला वेताळ प्रश्न विचारू लागतो. विक्रम हा राजस देखणा तरुण वेताळाला सोबत नेण्याचा हट्ट का धरतो? वेताळ स्मशानात राहतो तिथे राजा दुर्दैवाने का पोहोचतो?

अनेक विक्रमी विक्रम राजांच्या नशिबात वेताळ का येतात?

जगाच्या अंतापर्यंत प्रश्न संपणार नाही. विक्रमाच्या बुद्धीचा फायदा घेऊन वेताळ त्याला बोलता करणार व निरुत्तर होऊन हि जिंकणार? का कोणी ठरवले?

विक्रम आणि वेताळ नक्की दोन वेगळया व्यक्तिरेखा आहेत का? एकाच व्यक्तीत कधी कधी विक्रम आणि वेताळ असतात. लिहावे न लिहावे या अशा दोन्ही व्यक्तीच्या गोंधळात विक्रम श्रेष्ठ ठरला. म्हणून लिहावेसे वाटले. पण रिकामे आकाश भकास देव्हारे पाहून माझी शब्द बघून मौन भंग पावल्याने वेताळ उलट होऊन झाडावर लटकू लागला. पुन्हा वेताळाचा जिंकला.



# ५० जय श्रीराम

राम भजन करूया आपण राम भजन करू या
नामस्मरण करूया
पूर्व सुकृते लाभ जाहला, नर देहामध्ये जन्म मिळाला
पावन त्या करू या आपण राम
हे घर माझे बालक माझे
क्षणभंगुर हे सर्वांचे ओझे सतत मणी स्मरुया ||1||
संसाराच्या भव सागरी या
रामभक्तीची नौका करूया, सुलभपणे तरु या ||2||

प्रभू श्री रामचंद्राच्या बद्दल प्रेम, आदर, कौतुक असे वेगवेगळे भाव जनमानसात आढळतात. प्रभू श्री रामचंद्रांच्या बद्दल चर्चा, सीतामाई बद्दलची गूढ सहानुभूती या सर्वांची चर्चा नेहमीच होते. वेगवेगळया काळानुरूप समाजमनाचे कवडसे, मिसळत विविध लोककला व लोकगीते कथा, दशावतार, नाटुकली या मध्ये प्रभू रामचंद्राचे चरित्र दाखवले गेले.

रामायण हि जीवांची सकारात्मक बाजू आहे. सत्याचा विजय होतो, सदगुणांमध्ये सामर्थ्य आहे, हे संदेश रामायणातून मिळतात.

रामनामाचे महत्व फार पूर्वापार काळापासून चालत आलेले आहे. ज्या प्रमाणे कार्यारंभी श्रीगणेशाचे स्मरण केले जाते त्या प्रेमाने कार्य पूर्णत्वाला जाताना प्रभू श्रीरामांचे स्मरण केले जाते.

जसे राम राम पाहुणे, आता राम म्हणू या
आम्ही जातो आमच्या गावा
अमुचा राम राम घ्यावा
महात्मा गांधींच्या संधीवर "हे राम " असे लिहिले आहे.
रामो राजमणी सदा विजयते
रामम रामेशं भजे, असे शाळेत शिकवले जाते.

गीत रामायणातील रामायणाची मोहिनी जनमानसावर अजूनही टिकून आहे. प्रभू श्रीराम हेच आपल्या जगण्याचे कारण आहेत. जीवनातील राम आहेत.

# ५१ अप्रकाशित

प्रकाश झोतात न आलेली कलाकार व्यक्ती व त्याची अप्रकाशित कला अपयश देऊन जाते. या अपयशाच्या वेदना सांगणे कठीण असते. समोरच्या व्यक्तीला ह्याची आर्तता कळत नाही. दोन तीन वेळा पुन्हा पुन्हा हरले कि जिंकायची ईर्षा संपते. तुम्ही त्या वेळी रेटा देत लढत आजूबाजूचे मजाच बघतात. कधी आजूबाजूचे तुमच्या जवळचे असले तरी कैक मील दूर असतात. तुम्ही रडत देवळांचे उंबरठे झिजवता, वाट पाहतां त्याला जाग येईल, देवाच्या कृपेने तरी साहित्य प्रकाशित होईल. प्रिंट मीडियातील कुणीतरी मदत करेल, फासे पालटतील. मात्र कुणीतरी पुढे आतमध्ये सत्याची कल्पना आलेली असते. कुणीही येणार नाही, तुम्ही प्रयत्न तर करता पण पुन्हा हरता. शेवटी तुम्हाला कळते मी मिसफिट आहे. मी म्याच मधून बाहेर पडले आहे. आय ह्याव तू क्वीट. काही अंतर  चालत बाहेर आल्यानंतर कळते त्या दलदलीतून बाहेर पडणे सुद्धा अवघडच होते. इतरांच्या हसण्याने हैराण होताना वाटते, "इतर काय म्हणतात, कशाला विचार करायचा?" पण हे उमजणे कठीण असते. तुमच्या बाजूला कुणी होते का? वाचकातील सर्व नाही तरी बहुतांश लोक तर फायद्याच्या बाजूनेच असतात. ते त्यांना कमी त्रासाचे कमी कष्टाचे असते ते करमणूक प्रधान वाचण्यातच वाचकांचा आनंद असतो.

लिहिताना संयम, मिळालेल्या दुखःचा स्वीकार, नवीन बदलाशी तडजोड, करावीच लागते. मनुष्य आहे चुकणारच, यातील काही चुका,तुमचे आयुष्य उधवस्त करू शकतात. या चुकांबद्दल लोकांद्वारे केली जाणारी टीका, दिले जाणारे बौद्धिक ऐकावेच लागते. चुका विसरायला सवय करावी लागते. प्रॅक्टिस करावी लागते. बऱ्याचदा या अभिव्यक्ती स्वातंत्र्याची गळचेपी होते. किंवा संधी नुसार नियम बदलतात. जे विकते ते लिहले जाते. सत्याच्या अपयशाची चर्चा सर्वत्र होते. चप्पा



चप्पा चर्चा चले असे झाले आहे. मनात माचीस जळत राहते. समुद्रपक्षी चांदण्याचे कोष असे हे स्तंभ आहेत. दूरदर्शन, रेडिओ , इंटरनेट मुळे लिखाण कादंबऱ्या हे साहित्य एक भूतकाळच बनले आहेत. वाचनालयातील गर्दी कमी होते आहे. मात्र याचवेळी आपण वाचलेल्या गोष्टीची एक चौकट बनवून त्यात आजचे अनुभव बसवू इच्छितो. आपण वाचलेल्या धड्यातुन कहाण्यातून, संवादामधून आपण काहीतरी शिकतो. स्वतःला ओळखतो, भावना जाणतो. वाचनाच्या आनंदातून आपण बाहेच्या जगासाठी जाण बाळगतो व माहिती काढून घेतो. त्यामुळे सर्वप्रकारचे वाचन आवश्यक असते.

डायरी लिहून काही व्यक्ती रोजच्या अनुभवातून बाजूच्या व्यक्तीशी भवतालाशी व वैश्वीक भावनेशी नाळ कधी जुळली जाते हे जाणून घेतात व तो प्रवास लिहितात. हि डायरी एक संवाद असतो. अज्ञात वाचकांशी त्या अज्ञात शक्तीशी व जीवनाशी सुद्धा ! त्यात फक्त करमणूक नसावी.

जीवनाचे प्रतिबिंब म्हणजे साहित्य होय. त्यात सामाजिक, आर्थिक, तांत्रिक, बदलांचेही प्रतिबिंब दिसते. उदा.कबुतराद्वारे संदेश देणाऱ्या काळापासून पत्रे, तार, फोन,मोबाईल, इंटरनेट अशा प्रकारे झालेला संदेश वाहनाचा प्रवाशी या साहित्यातून कळतो.

अंतर्गत संघर्ष, युद्धे, असुरक्षितता, वाट पाहणे, लढाया या सर्वांचे प्रतिबिंब, तत्कालीन साहित्यात दिसते. आपले अनुभव स्वप्ने, यशापयश, आशा, या समान भावना व व्यक्तीची भीती साहित्या द्वारे समजते. त्यामुळे कुठलेही लिखाण हे सर्व समावेशक बनू शकते. अर्थ क्रांती सुद्धा घडवू शकते. प्रत्येकाचं लेख त्यामुळे प्रसिद्ध होणे चांगले व योग्यच ठरेल. लिखाणाद्वारे मनापासून व्यक्त केलेले भाव प्रकाशित होवो न होवोत ते संवाद साधतात. आशा देतात. ते लेखकांच्या लिखाणाला रद्दीत विकलेले बऱ्याच चित्रपटात दाखवतात. अप्रकाशित साहित्यावर सुद्धा ती वेळीसुद्धा येते. मात्र काजव्याप्रमाणे काही काळ तरी त्या लिखाणाने एखादा क्षण तरी उजळलेला असतो.

प्रकाशित व अप्रकाशित या शब्दात फक्त "अ" चाच फरक असतो. पण अणू सुद्धा अ पासूनच सुरु होतो. त्यामुळे सर्वप्रकारचे साहित्य प्रकाशित होते. आवश्यकच असते.

देवळातल्या अंधाऱ्या कोपऱ्यात सुद्धा सुंदर मूर्ती असू शकते तसे अप्रकाशित साहित्य सुद्धा सुंदर असू शकते. सर्वांना संधी मिळाली तर?

# ५२ एक दुपार सुस्तावलेली

सुदिन, सुवेळा अशा शब्दात दुपारचे वर्णन कधीच केले जात नाही. उन्हाळी दुपारच्या वेळी काम संपवून मी बसले होते. मोलकरीण काम करून गेल्या. नवरा ऑफिसला व मुले कॉलेजला गेली. दुपारची सुस्ती चढत होती. वेळ जात नव्हता. काम करण्याचे म्हटले तर कामे भरपूर होती. पण कुठलेही काम आतपर्यंत पोहोचत नव्हते व शरीर "कामाला लाग " हि आज्ञा स्वीकारताच नव्हते. जणू सक्तीची विश्रांती होती. पण शरीराला ती हवी हवीशी वाटत होती.

काहीतरी करावे काहीतरी लिहावे पण शब्द सुद्धा वेदनेचे पंख घेऊनच येतात. आतून जन्मतात, माध्यान्हीची उन्हे शरीराला खूपच शुष्क करतात. पण कामांच्या नादात कधी लक्षातच येत नाही. दिवसांच्या या दुपारवेळीचा दिवसाचा भाग म्हणून आपण कधी विचारच करीत नाही. सुपारीला सुरुवातीला खूप फोन यायचे. हे कसे करायचे, ते कसे करायचे वगैरे. मी हि याचे काय झाले, त्याचे काय झाले? चौकशी करून असे करा, तसे करा सूचना देई. पुढे पुढे त्याच त्या मागे पडलेल्या ऑफिसच्या गोष्टींचा चोथा नको वाटू लागला. माझ्या वाचून कुणाचे अडत नव्हते. किंवा पडल्यावर माझी मदत ते घेतात हे तेव लपवत होते. मग मीच एक दिवस फोन घेणे बंद केले. धावपळ लगबग नाही अशा दुपारी चिमण्या बघा कावळे बघा, झाडांची पाने कशी लयबद्ध हलतात. पक्षी कसे पंख फडफडावतात, पाणी प्यायला अंगणात येतात त्याचेही निरीक्षण झाले. सुस्तावलेली दुपार अजूनच अंगावर येऊ लागली.

लहानपणी शाळेत "माहेरची वेल" नावाची कथा अभ्यासाला होती. दुपारच्या उन्हाने मार्गलेली वेल घरा बरोबरच वाहते. सकाळी उठते, दुपारी कंटाळते, व संध्याकाळी पुन्हा तरतरीत होते. अशी ती गोष्ट होती. मला मात्र हल्ली तिन्ही त्रिकाळ कंटाळा येई. सर्जन रंग व सृजन गंध जवळ फिरकतच नाही. लिहायची वेल हि रात्रीचीच असते.



जुनेच अन्न पोटात स्वस्थ पडलेले असताना नवीन आता भरावेसे वाटत नव्हते. एवढ्या गरम झळांच्या उन्हाळयात चहा प्यावासाचं वाटत नव्हता. दुपारची झोप मी कधी घेत नाही, त्यामुळे नुसते लोळणे पण नकोच ठरवले आहे.

सोबतीला वाचनालयाची पुस्तके होती. जवळ फोन होता. टीव्ही हि होता. पण एक अबोल शांतता मला काहीही करण्यापासून थांबवत होती. वेळ घालवण्यासाठी काहीही न करता विचारताच वेळ गेला. संध्याकाळ झाली कि वाटणारी गडबड व दुपारच्या सुस्तावलेपणाची शांतता याच्या सीमारेषे पाशी कपबश्यांची किणकिण ऐकू येऊ लागली. मीही चहा करायला उठले. दुपार सुस्तावलेली संपली होती. दिवस पुढे सरकत होता.

## 5३ "कॅमोप्लेज"

स्वतः चे अस्तित्व टिकवण्यासाठी रंग रूप बदलून वेष बदलून शत्रूला युक्तीने फसवणे याला कॅमोप्लेज म्हणतात. निसर्गात प्राणी, कीटक, पक्षी यांच्यात हे रंग बदलणे आढळते.

अस्वल (पोलर बिअर) हा बर्फाच्छादित जागांवर आढळतो. त्याच्या पांढऱ्या फरने तो बर्फात ओळखू येत नाही. व शत्रू पासून त्याचे रक्षण होते.

सरडा रंग बदलतो म्हणून त्याच्यावर टीका होते पण उडणारे पक्षी, घारी जनावरे यांच्या पासून रक्षण करण्यासाठी ज्या झाडावर किंवा लाकडी खोडावर किंवा ज्या दगडावर असेल त्याचा रंग स्वीकारून रंग बदलून सरडा शत्रू पासून स्वतःचे रक्षण करतो. खारीचा रंग झाडाच्या खोडा सारखा असतो. काही किडे हिरव्यागार पानांआड लपून राहण्यासाठी हिरवा रंग धारण करतात. काही फुलपाखरांचे ककून (टोपली सारखे) पक्षांच्या विष्टे प्रमाणे रंगरूप धारण करून शत्रू पासून स्वतः चे रक्षण करतात.

फुलपाखरे फुलासारखा रंग धारण करतात. कधी जमिनीवर बसणारी फुलपाखरे बाहेरून जमिनीच्या आकाराची व आतून रंगीबिरंगी असतात. पिवळी फुलपाखरे झाडाची सुकलेली पाने वाटावी अशी हायबरनेट करतात.

पक्ष्यांचे ट्विटर आवडतेच. छोट्या पक्षांना मोठ्या पक्षांपासून खाल्ले जाण्याचे भय असते. हे पक्षी पाना आड दडतील असे रुपरंग घेतात. कासव शत्रूची चाहूल लागताच पाय पोटात घेऊन दगडा सारखे रूप घेतो. झाडाच्या ढोलीत बसणारे घुबड पूर्णपणे ढोलीच्या लाकडाचा रंग व रूप घेऊन लपून राहते. बघणाऱ्यालाही कळणार नाही अशा रीतीने ते त्या झाडाचाच भाग बनते. त्याचा आवाजसुद्धा झाडाची फांदी वाजल्यासारखाच असतो. चाहूल न देता सुंदर मोरपिसारा पसरून मोरणीला आकर्षित करणारा मोर पिसारा बंद केल्यावर त्याचे मातकट पाय घेऊन झाडामागे लपून राहू शकतो.

समुद्र पक्षी त्याच्या निळया पांढऱ्या रंगामुळे त्या निळया पांढऱ्या लाटांमध्ये, समुद्राच्या फेसामध्ये खडका आड सहजच लपू शकतो. माणूस हा कीटक, पक्षी प्राणी, यांच्यातील थोडा प्रगत प्राणी आहे. व माणूस सुद्धा काळ-वेळ बघून रंग बदलू शकतो. शत्रू पासून स्वतः चे रक्षण करण्यासाठी किंवा यशासाठी झेंड्याचा रंग बदलू शकतो. ते हि कॅमो प्लेजच असते. या रंग बदलत्या जगामध्ये माणसाची नियत ठीक नाही. सांभाळून राहा सख्यंनो. माणसाचे इमान विकते.



## ५४ ती वेळ आली आहे

या देशाला भोगाची ग्लानी चढली आहे. दूरदर्शन अविचारांसाठी वापरले जाते आहे. प्रत्येक गोष्ट घडण्याची एक नियत अशी वेळ असते. लोकसत्ता मुबई दिनांक 11/4/12 मधील "गरिबी विसरण्यासाठी स्वप्नरंजनाचे व्यसन" हा लेख वाचून मला असे वाटते दूरदर्शनच्या व्यसनांपासून समाजाला वाचवण्याची वेळ आली आहे. उशीर होण्यापूर्वीच काहीतरी करायला हवे आहे. देऊळ या चित्रपटातील वृद्ध आई देवळात जात नाही मात्र दूरदर्शनच्या मालिका मात्र चुकवत नाही. अनेक झोपड्यात प्यायचे पाणी नाही मात्र टीव्ही हवाच व मालिकाही हव्यात. घरात शिरताच माणसे हल्ली दूरदर्शन संच सुरु करतात. तो रात्री अपरात्रीपर्यंत चालूच असतो. पूर्वी जेव्हा 1979 साली फक्त दूरदर्शनच होते तेव्हा नमस्कार आजचे कार्यक्रम संपले. पुन्हा भेटू या उद्या सकाळी, म्हणून निवेदिका आपली रजा घेत असे. आता भरमसाठ चॅनल बशीपासून छत्री पर्यंत! डिश अँटेनांनी, पडके असले तरीही ) करमणुकीचा अतिरेक करीत, स्वप्नरंजनाला खतपाणी घालत लोकसंख्या वाढत राहिली. व दिवस रात्र चालणाऱ्या दूरदर्शनच्या चित्रवाणी संचासाठी अधिक वीज हवी म्हणून विजेची मागणी वाढली. वीजकपात टाळण्याचा सहज सोप्पा मार्ग म्हणजे सर्वच चॅनल रात्री दहा वाजता बंद करणे होय. पूर्ण देशाची जी अनेक मेगावॅट वीज वाचेल त्याच्यामुळे भारनियमन करायची गरज पडणार नाही. स्वप्नरंजना बरोबर कठोर वास्तवाचे भान राखायलाच हवे. दूरदर्शन वर नियमन टाकून रात्री दहा वाजता टीव्ही बंद करणे, होणे, आवश्यक आहे. काही करायचे असेल तर आत्ताच करायला हवे, नाहीतर दारू सारखी टीव्हीची नशा चढेल.

# ५५ फलश्रुती

"हेच काय फळ मम् तपाला", असे आपण नेहमी म्हणतो. (म्हणजे फळाची अपेक्षा असते) गीतेचा संदेश सांगतो, कर्मण्ये वा धिकारस्ये ना फलेषु कदाचन. कोणतेही व्रत करतांना आपण फलश्रुती काय असे विचारतो. गणेश स्तुती मध्ये सुद्धा या श्लोकाच्या वाचनाची फलसृती सांगितलेली असते. रंगीबेरंगी फुले कितीही आनंददायी असली तरीही, फळाचे महत्व जास्तच असते. फुलझाडे व फळझाडे यात उपयुक्तता व किमतीत फळझाडे वरचढ ठरतात. शात्रज्ञ सर एझेक न्यूटनला झाडावरील एक फळ खाली पडताना पाहून न्यूटन चा फलदायी गुरुत्वाकर्षणाचा नियम सुचला. ऍडम व इव्हने ऍपल म्हणजे फळ खाल्ल्यामुळे पुढे प्रजनन झाले ते ऍपल फळाचं होते. उपवासाला फळे कंदमुळे खाऊन व्रत केल्यास लवकर फळते. (फळ शब्द आलाच)

फळांचे व फळबागांचे कौतुक व किंमत जास्तीच असते. फळफळू दे म्हणत आशीर्वाद दिला जातो. फुले फुले असा आशीर्वाद देताना फुलांच्या पेक्ष्या फळने महत्वाचे असते. प्रेमाच्या वेलीला फुल येणार म्हंटले तरीही फळाची अपेक्षा प्रेमातच असते. श्रुती श्रुती म्हणजे सांगोपांग ऐकीव माहिती. ती महती फळ कसे महत्वाचे ते सांगणारी एक गोष्ट असते. हे फळ कितीही स्वादिष्ट असेल व ती जीवनसत्वांनी भरलेली असली तरी त्यांना नाशवंततेचा शाप असतो. धान्य अधिक काळ टिकते मात्र फळे लवकर खराब होतात. विष्णूच्या पूजेला फुले पत्री व फळे घ्यावी असते सांगितले जाते. फळे हि उंचावर असतात. व फळे तोडण्यासाठी कष्ट करावे लागतात. छोटी किंवा मोठी फळे सर्व वजनदार असतात. त्यांच्या 75% भाग पाणीच असते. फळांचे रंग सुद्धा किती आकर्षक असतात. निसर्ग व वृक्ष वल्ली वानवळा फळांच्या टोकारीच्या रूपाने एक बक्षिसाचं देतो. ते मानवाच्या वृक्ष संवर्धनाचे फलित असते. (फळ शब्द आलाच) स्वतःच्या लावलेल्या झाडाची फळे खायला मिळायला भाग्य लागते. सामान्यपणे पिबानी नादिया स्वयंमे नाभ्यम, परोपकाराय इंद शरीरम! आंबे असे म्हणत झाडे स्वतः ची फळे खात नाहीत. असेच सांगितले जाते. सुकामेवा, केली, चिक्कू, संत्री, श्रीफळ हि सर्वोकृष्ट फळे आहेत. ती फळे लाभदायी असतात.

यथा मिलीतोपचारेन, फलेन पुजितंमया

परपुर्णम तादास्तुमे ! ह्या फलपुराणाचे लिखाण मी केले आहे. हि फलश्रुती आहे मला फळ मिळू दे!



# ५६ तिरपी उन्हे

आयुष्याची तिन्हीसांज झाली कि जीवांचे उन्ह कलू लागते. झाडांच्या शेंड्यावरून सूर्यनारायण चोरपावलाने निरोप घेत आहेत. मी जड मनाने व दुखऱ्या पायानी बघते आहे. झाडे किती सोशिक असतात, मोसम पाहून रंग बदलतात, पणे गाळली तरीही गप्प बसतात. एकत्र राहतात पण एकेकटी जगतात. एकावर कुर्हाडीचा हल्ला झाला तरीही गप्पा का बसतात? पर्याय नसल्याने एका जागी स्थिर राहतात. माणसांना चालवेच लागते. खरेतर, माणसांचे तरी वेगळे काय असते? स्थिर राहावे लागते. मजबुरीने !

यु सारी जिंद मर मर के जी लिये, हे गाणे फेमस झाले कारण ते सत्य आहे. गोष्टी मागची गोष्ट हीच असते कि तडजोड करत मरत मरत जगावे लागते. एखाद्या गावातील चिंचोळ्या गल्लीतून बाहेर पडावे लागते व खंतही व्यक्त करता येत नाही. भारद्वाज पक्षी ताठ्यात वावरतो. पण तो हि माणसाची चाहूल लागताच उडून जातो. तसे स्वाभिमानाचे नाटक केले तरीही "यु सारी जिंदगी मर मर के जी लिये" हे सत्यच ठरते. उरते. उन्हे माध्यान्हीची असोत पण त्यांना तिरपी उन्हे व्हावेच लागते. वयोमानाने स्वातंत्र्य देशाला मिळाले मनांना नाही. दारुडे ज्याप्रमाणे दुःख विसरायला नशा करतात तसेच वेगळ्या ग्लानीत व नशेत माध्यम वर्गीय अलिप्त राहून वावरत आहेत. अपघाताचे फोटो काढणारे त्या अपघात ग्रस्तांना मदत करतात का? कि फक्त चर्चाच करतात? एकादी चांगली व्यक्ती हरते ती हार वैयक्तिक नसते संपूर्ण समाजाच्या नीतिमत्तेची असते. वाईट मांससे असतातच पण दुर्दैव हे कि चांगली माणसे त्याचे कर्तव्य टाळतात. अलिप्त राहतात. उन्हे कलली आहेत व स्त्री म्हणून असलेली सहनशीलता आता संपत आली आहे. उरली आहे एक अनामिक भीती ! चिंध्या झालेली अस्मिता, अपमानाची सल घेऊन थकलेल्या गात्राणि निरोप घ्यावा लागतो आहे. समाज मात्र प्रश्न टाळून फिलगुड वर खुश राहतो आहे. करमणुकीचा अतिरेक झाला आहे.

गगन ठेंगणे व्हावे एका गोंडस हर्षाने

लेक माझी म्हणताना माझी म्हणून ओळखावी

समाजात डौलाने हिऱ्याप्रमाणे चमकावी

असे म्हणणारे आई वडील काळाच्या पडद्या आड गेले आहेत. व चमकू शकलेली मी अंधाराच्या पडद्या आड चालली आहे. हो मी हरले आहे. उन्हे कलली आहेत. आणि छोड आये हम वो गलीया , हे सत्य आहे!



# ५७ तिसरी तिज

अक्षय तृतीय हा मुहूर्त साडेतीन मुहूर्तांपैकी एक आहे. अक्षय शब्दातच तीन अंगांची पूजा अपेक्षित आहे. तन,मन,धन! तनासाठी शरीरासाठी आरोग्यदायक पदार्थांचे सेवन केले जाते. मनशुद्धीसाठी दान केले जाते. व धनासाठी हिरे सोने व चांदीची वस्तू खरेदी केली जाते. या दिवशी केलेल्या कार्याला क्षय म्हणजे नाश होत नाही.

भौतिक, अध्यात्मिक व सामाजिक असे तीन परिणाम यात आहेत. चित्र शुक्ल तृतीयेच्या पहिली तीज, गौरी तीज होय. चैत्र कृष्ण तुरटीईची दुसरी तीज, व आषाढ तृतीयेच्या तिसरी तीज, आखि तीज असे हे सौभाग्य शयन व्रत दोन टप्प्यात चढते उतरते असते. या तिथीला युगादी तिथी म्हणतात. या दिवसापासून त्रेतायुग सुरु होते. गृह खरेदी, वाहन खरेदी साठी हा शुभयोग उत्तम योग असतो.

वासंतिक उत्सवाचे अनेक कार्यक्रम या दिवशी होतात. नैसर्गिक रंगांचा व वस्तूंचा आनंद सण व उत्सवात घ्यावा. या दिवशी कुबेर व लक्ष्मीची पूजा करतात. सुदर्शन कुबेर यंत्राची याच दिवशी स्थापना करतात. रेणुकामाता व परशुरामाचे सुद्धा पूजन केलेलं जाते. याच दिवशी परशुराम जयंती असते. हि नाव वर्षाची पहिली तृतीया असल्याने चैत्रगौर मांडून गौरीपूजनाला सुरुवात होते. गौरीपूजा व्रत हळदीकुंकू, गौरी पुढे खेळ फुगड्या, देवीच्या आरत्या व अन्य असे वासंतिक उत्सवाचे कार्यक्रम असतात.

तनू आरोग्यासाठी सरबत, मातीच्या माठातील जल, पंखे, आंबे सुगीचे धान्य यांची पूजा होते. संपूर्ण कुटुंबीय आमरसपुरी किंवा श्रीखंड पुरीचे मिष्टान्नाचे भोजन करतात.

गोवा व कोकण विभागाला परशुराम क्षेत्र म्हटले जाते. परशुराम ह्यांना विष्णूचा सहावा अवतार मानतात. परशुरामांची समुद्र मागे हटवून भूमी वासवल्याची कथा आहे. कुटुंबातील सर्वांनी खेळीमेळीने ऋतूबदलाचे व निसर्ग बदलाचे भान ठेवून पर्यावरणाचीही जाण ठेवावी. पूर्वजांच्या नावाने जप तप दान करून त्यांच्या आत्म्याच्या शांतीसाठी प्रार्थना करतात. अक्षय तृतीया हा दिन आपण सर्वांना खूप खूप आनंदाचा जावो.

# ५८ नागमोडी वळणं

नागमोडी वळणाचे आकर्षण माणसाला नेहमीच असते. घाटातील वळणदार रास्ता, वळणावळणाची पायवाट, वाकडे झाड, वाकडी वेल, नागमोडी अंकुर, नदीचे किनारे, आयुष्य एक नागमोडी वळणं असते, कधी यश कधी अपयश! चढ -उतार- सपाटी हे सत्य कधीतरी स्वीकारावे लागेल यासाठीच ते आकर्षण जन्माला येत असावे.

'कधी शिशिर कधी वसंत
दोन्ही एक परंतु
डोळयांमधले असू पुसती
ओठ वरले गाणे

अशी हि वळणे येतात व पुढे सपाट पायवाट लागते. प्रत्येक वळणावर मनाचा एखादा कोपरा दुखावलेला असतो. कच्च्या काचेची वस्तू तुटते, पण पक्क्या काचेच्या खिडक्या टेबल दीर्घकाळ टिकतात तशी तुटलेली स्वप्न तकलादू म्हणायचे व वळणं पार करायचे. आपण मनाला लावून घेतले नाही कि बास! अर्थात हे भलतेच अवघड असते. स्वतःला पक्के करायला हवे म्हणून हळवेपण संपत नाही. मैत्री करायला जावे तर निरुत्साह भेटतो आणि विना प्रतिसाद राहायचा प्रयत्न करावा तर शत्रुत्व मिळत. आर्ट ऑफ लिव्हिंग इतकीच आर्ट ऑफ लिव्हिंग सुद्धा महत्वाची ठरते. जाऊ द्या सोडा, म्हणायचे पण त्यातच रंगळायचे किवां सोडून आलेल्या वस्तूंची धूळ पायाला घेऊन वावरायचे. पण हिम्मत हरायचे नाही पुढे पुढे जायचे.

मैं गीता रखता हू, कुरान रखता  हू
बायबल ग्रंथ भी रखती हू
मैं मझहबोनके फर्क मी नहीं पडती
क्योकी ते दिल मे हिंदुस्थान रखती हू
कोई हिंदू, कोई मुसलमान
कोई इसाई है
और सबने इन्सान ना बननेकी कसम खाई है
फिरका फिरस्ती परी दो मे कहा होती है
कभी मंदिर पे जा बैठे कभी मस्जिद पे



पण माणूस जाती, धर्म देश प्रांत सर्व प्रकारचे भेट व भिंती घेऊन वावरतो. जिने तुटतात, पूल कोसळतात, राजवाडे ऐतिहासिक स्मारके तुटतात पण भिंती अभेद्यच राहतात. परीक्षा अली कि ताण येतो. हे वळणं घातक ठरते. सरळ रस्ता नेहमीच नशिबी येत नाही. मैत्री नेहमीच मिळत नाही. जे समोर येईल त्या नागमोडी वळणावरून पुढे जावेच लागते.

# ५९ अपयशाची भीती

अपयशाच्या भीतीने मी नेहमीच दचकून जागी होते. अपयश सहन करतानाच्या कल्पनेच्या वेदना ह्या प्रत्यक्ष दुःख जेव्हा सामोरे येते. त्यापेक्षा खूपच कमी का असतात? कल्पनेतील भीतीनेच आपण ते दुः ख दोनदा भोगतो. एकदा कल्पनेत व दुसर्यांदा वास्तवात.

फियर ऑफ फेल्युअर इज वर्स द्यान फेल्युअर इट सेल्फ

3 मेदीत जेव्हा खजिन्याच्या शोधात आपण मैलोनमैल जातो तेव्हाच्या वेदना त्या स्वप्नपूर्ती साठी केलेले प्रयत्न असतात. येणाऱ्या सर्व संकटांचा आपण त्या वेळी सामना करतो. मात्र हरल्यावर जर हरलो तर परत येताना चार पावले टाकणे सुद्धा मुश्किल होते. मात्र यशाचे स्वप्न सर्वप्रकारची हिम्मत देते. जर हिम्मत केली नाही तर सरळसोट आयुष्य मिळते. चढ उतार नसतात. सुरक्षितता असते.

ह्या स्वप्नाला या ध्येयाला मी योग्य आहे का? माझी योग्यता आहे का? या स्वप्नाला शोधात या लढाईत मला बरेच काही गमवावे लागेल का? मला कष्ट पडतील, जवळच्या व्यक्तीत माझ्यापासून दूर जातील या भीतीने अनेक स्वप्न मुळातच खुडली जातात. अर्थात लढाई सोप्पी नसते. कधी कधी या लढाईत मोठे नुकसान होण्याची शक्यता असते. काही शत्रू खूपच दुष्ट असतात. स्वप्नाच्या नादात शत्रूला पण कमी लेखून फसतो. खालच्या पातळीवरचा, शत्रू एखादा वर असा करतो कि, तो प्रहार सहन होण्या पलीकडे असतो. सांघिक हल्ला करणारे दुष्ट लोक सुद्धा असतात. झाशीची राणी शहीद झाल्यावर विदेशी साहेब बरोबर डावात झोडणारे सुद्धा असतातच कि!

कक्षाला डोक्याला त्रास त्रास हवा, काढा कसेतरी दिवस असा सल्ला देणारेही असतात.

अजून अजून दुः ख देण्यासाठी पायात काटे टोचण्यासाठी नवीन स्वप्ना मागे धावण्यासाठी उरली नाही उमेद पदरी,

सरली आहेत स्वप्ने सारी देवावरचीस श्रद्ध कितपत खरी?

देव नसतोच का त्या मंदिरी?

खूप सध्या वाटणाऱ्या माणसांमध्ये वावरून बघितले. पण त्यातील काही सामान्य व्यक्ती सुद्धा आपल्या अंगरख्याच्या आत शस्त्र दडवून होत्या. कधी हे शस्त्र



कपटाचे होते, कधी फसवणुकीचे होते, कधी दुर्लक्ष करण्याच्या वृत्तीचे होते. युद्ध झाल्यावर काही शहीद पडलेले आढळले पण नक्की काय झाले, आपल्याला कसे फसवून मारण्यात आले हे त्या मृत व्यक्ती सांगू शकणार नव्हत्या. काही खून हे एका झटक्यात सुरा खुपसून झाले. काहींना हालहाल करून मारले तर काहीजण जखमांमधून रक्त वाहून मेले. एक भीषण शांतता त्या जागेवर उरली. एखादी ओढणी झालेल्या नरसंहाराची माणुसकीच्या खुनची गोष्ट सांगत राहिली. पण त्या मळक्या, डागाळलेय ओढणीकडे कुणीही लक्ष देत नाही. बेअब्रू झालेली ती बळी गेली विस्मृतीत जाते. ज्याचे त्याचे नशीब ज्याला त्याला त्या दिशेने ओढून नेत असते. "जायचे" ठरवूनहि उपयोग नसतो. "जायचे नाही" म्हणूनही नसतो.

हि नोकरी मला काय देईल?

माझी लेखणी मला कुठे नेईल?

मला ती काय संदेश देते?

कोणता झेंडा घेऊ हाती?

झुंडीचा झेंडा ठेऊ खालती?

दत्तगुरु कुत्री घेऊन राणीवाणी भटकतात. त्यांच्या कुत्र्यांच्या भुंकण्याला कुणी घाबरत नाही. साईबाबा श्रद्धा आणि सबुरी सांगतात.

अर्ध्या रात्री अंतरिक्षातुन जाणारे विमानातून शंकर पार्वती पृथ्वी बारीक एकाकी लढणाऱ्या रडणाऱ्या बालकांना मदत करतात. त्या गोष्टी फक्त पुराणातील कथा कहाण्यांमध्येच असतात. प्रत्यक्षात देवळे म्हणजे संस्थाने असतात. देव सुद्धा हल्ली देवळांमधल्या सुखासीनतेची चटक लागून वेगळाच वागू लागला असावा का?

मंदिरात आलात या, दर्शन घ्या

प्रसाद खा, पावत्या फाडा पावत्या.

सोन्याचांदीचे दागिने देवाला अर्पण करा

देवाच्या चरणी लावून स्वतःलाच नटवा

पण या गाभाऱ्यातील मूर्तीकडे बघा

ती प्रतिकृती आहे, सत्य नाही

या देवळात देव उरलाच नाही !

नवीन देवासाठी घासाघीस चालू आहे, टेंडर मागितली, भरली आहेत.

देवाचे सजावटीचे दर फार महाग आहेत.
तशी देवाची जागा रिकामी राहिली तरी
फारशा कुणाला समजणार नाही तरी !
नाही देव सापडला देवळात
तरी आनंद आहे या राऊळात
छान पिकनिक करावी तसेच
उंच देवळातील फिलगुड असेच
मानण्यावरच नीती दिसू असेच !
फार वर्षपूर्वीच त्या देवाने पृथ्वी वरून मुक्काम हलवला आहे नेमाने
शोधताना मानवाला लागली धाप
आडोशाला गर्दी झाली आपोआप
देवळामधला देव नाही सामन्याला पावत !
कारण अगतिकपणे जे घडते ते बघणे फक्त त्यांच्या हाती आहे.

म्हणून तर हताश चेहरा घेऊन बसतात. शिळेवर! माझ्या प्रश्नाचा विचार न करता!

युद्ध असो किंवा दोन व्यक्तींचे अहंकाराच्या टक्करीचे युद्ध असो. शक्तीच्या संतुलनासाठी देव दोन्ही बाजूंच्या मागे असतो. त्यामुळे अशी युद्धे अधिक काळ टिकतात. या युद्धामध्ये तह झाले तरीही ते तह नसतात ती हरच असते. कमी शक्तिशाली व्यक्तींवर शक्तिवान व्यक्तीने केलेली कुरघोडी असते. शेवटी शक्तिवान व्यक्तीचीच विजय होत असतो. दुबळया व्यक्तीला अहंकारी, मूर्ख समजून बाहेर फेकले जाते. युद्धाचा शेवट ठरलेला असतो. नेहमी शक्तिशाली व्यक्तीच दुर्बलांची गळचेपी करते. आणि आपला विजय साजरा करते. उत्सवात सत्य लपते. तीन गोळया घालून चांगल्या विचारांना नेहमीच मारले जाते. त्यामुळेच अपयशाची भीती वाटते. असत्याची भीती वाटते. अज्ञाताची भीती वाटते.

हार दुर्बल हरणार व ताकदवान जिंकणार हे निश्चित असते, तर देव दुर्बलाला जिंकण्याची खोटी अशा का दाखवतो?

मला अपयशाची भीती वाटते आहे. मात्र जर मी हरले, तर .....
कोणी विचारेल जेव्हा हरळी कशी इथे मी
तेव्हा जरून सांगा लढले कशी इथे मी.



# ६० मंगळसूत्र महोत्सव

"पुणे तिथे काय उणे" अशा आपल्या त्या सांस्कृतिक शहरात मुबई सारखेच आंग्लाळलेले वातावरण हल्ली झाले आहे. खरे तर नको त्या घटनांनीच पुणे जास्ती गाजते. त्याच त्या पुण्यनगरीतून गाडी येत असताना एक जाहिरात वाचून मी चकित झाले. ती जाहिरात होती

"मंगळसूत्र महोत्सव"

मंगळसूत्रांमधून आपल्याला आवडेल ते मंगळसूत्र खरेदी करा"

आंबा महोत्सव असतो, युथ फेस्टिवल असतो, पुणे फेस्टिवल, गणेश फेस्टिवल, तास आता मंगळसूत्र फेस्टिवल असा, साड्यांच्या सारखा सेल लावावा! किंवा चार खेळणी, दोनचार भेळेच्या, चायनीज च्या गाड्या, आकाशपाळणे, एखाद्या तथाकथित व्ही आय पी च्या हस्ते व उपस्थितीत रिऍलिटी शो किंवा हौसी असावा आणि महोत्सवात जाऊन मजा अली म्हणत ढेकर देत घरी निघावे तसेच मंगळसूत्र महोत्सवाचे माहौल!

हे बघा मंगळसूत्र महोत्सव म्हणजे जरा तीच होते आहे असे मला वाटले बघा! फार फार पूर्वी म्हणजे खरंतर ऐतिहासिक काळापासूनच चार काळ्या मण्यांचे जबरदस्त आकर्षण स्त्रीला असते. बाळाच्या हातातील मनगट्या व स्त्रीच्या गळ्यातील काळे मणी हे तिच्या सुखाचे निधान असते. आणि मंगळसूत्राच्या मंगल धाग्यांभोवती स्त्रीचे विश्व कायम फिरत असते.

मंगळसूत्र खरेदी

लग्न ठरले बस्ते बांधले कि महत्वाची असते ती म्हणजे मंगळसूत्र खरेदी. दोन्ही कंदाची निवडक मंडळी ठेवणीतील दागिने शेलके कपडे घालून गोडवा जिभेवर पेरून खूप मणभर अपेक्षा घेऊन मंगळसूत्र खरेदीला येतात. मंगळसूत्रातील दोन वाट्यापैकी एकवटी व दोन मणी यांचे पैसे माहेरचे लोक देतात. नवरा बायको व इतरजणांच्या सल्ल्याने थाटामाटात लग्नाच्या मंगलप्रसंगी बांधले जाते. विवाह सौदर्य कुठे असते? तुला चार मण्यांमध्ये त्या मंगळसूत्रात? मी सुंदर नाही?

स्त्री जात्याच सुंदर असते पण त्या मंगळसुत्रचा घालण्याचे विवाहिता अधिकच सुंदर दिसते. दृष्ट लागू नाही म्हणून काळया मण्याची ती पोत किंवा जडावाचे ते मंगळसूत्र घालण्याची प्रथा आहे.

पुराणकाळ

पूर्वीच्या देवी देवतांच्या चित्रांमध्ये, सीतामातेच्या मूर्तीवर लक्ष्मी मातेच्या पोथ्यांमध्ये सुद्धा मंगळसुत्रचा उल्लेख आहे. याचा अर्थ मंगळसूत्र घालण्याची परंपरा फार पुरातन असावी.

पतीचे आयुष्य

पतीचे आयुष्य वाढावे म्हणून स्त्रीने मंगळसूत्र शिवाय कधी हि राहू नये असे तिला वारंवार सांगितले जाते. ग्रामीण भाषेत "डोरलं" या शब्दात मंगळसुत्रचा उल्लेख केला जातो. घटस्फोट किंवा वैधव्य आल्या नंतर स्त्रीचे गळयातील डोरले काढले जाते, म्हणजे मंगळसूत्र हा अलंकार नसून सौभाग्य अलंकार आहे. विवाहाशी संदर्भ आहेच!

दोन वाट्या

मंगळसूत्रातील दोन वाट्या, सासर महेर अशी दोन्ही घराची नाती दर्शवतात. एका वाटीत हळद, व दुसऱ्या वाटीत कुंकू भरलेले असते. एकाच वाटीची फॅशन पुढे अली तेव्हा वुद्धा स्त्रिया "हि वेगळे घर करणार" नवऱ्याला घेऊन सासरच्यांना तोडणार बघा" असे म्हणत! शिंपल्याच्या आकाराची मंगळसूत्राची वाटी लाभत नाही. शिंपला रिकामा राहतो असाही एक प्रवाद होता. पुढे जेव्हा खाद्याचे मंगळसूत्राचे पदक घालायचे फॅशन अली तेव्हा वाटी नसलेलं ते मंगळसूत्र बघून किती जणींनी नाके मुरडली. तेव्हा जुनीच वाटी जन्मभर नवीन गंथनात घातली जय. शेवटी जस्सी ला सुद्धा मेकअप करून सुंदर दाखवले गेले तसे मग मंगळसूत्रातही मेकओव्हर केले बदलले मॉडर्न झाले.

पण स्थिर होत माझी ओळख मीच असे म्हणणाऱ्या कर्तबगार स्त्रिया बारीकसे दिसेल न दिसेल असे एखादा काळा मणी, बाकी चेन असे मंगळसूत्र घालू लागल्या. ड्रेसवर छोटे चार ग्रॅम सोन्याचे, साडीवर लांब वाट्या असलेलं, (कांजीवरमवर ) शिफॉन साडीवर पोटापर्यंत लोंबणारे, लग्न कार्या साठी घसघशीत चांगले चार तोळयाचे अशी वेगवेगळया पॅटर्नसची मंगळसूत्रे मुले- स्त्रिया- वृद्धा सुद्धा खरेदी करू लागल्या. मंगळसूत्राने अलंकार दागिना असे रूप धारण केले. मंगलदायक त्याचे रूप तरीही बदलले नाही तो सौभाग्य अलंकारच होतो व अजूनही आहे.



पुरुष कुठे मंगळसूत्र घालतात, आपण कशाला घालायचे? असे म्हणत पॅन्ट शर्ट वर शोभत नाही म्हणून हल्ली तर मंगळसूत्र घातले जात नाही. अगदी "जुने ते सोने" व "नवे ते सर्व वाईट" अशी टीका मी करीत नाही. पण सवाष्ण म्हणजे विवाहित असलेली स्त्री व तिच्या गळयातील चार काळया मण्यांनी ती सुरक्षित वाटते, हि कल्पना सुद्धा पुण्यनगरीतील त्या नराधमांनी खोटी ठरवली आहे. पण शेवटी काय स्त्री असण्याचा तो अग्ली साईड एफेक्ट आहे. तरीही आपण चार काळे मणी घालून, मंगळसूत्र घालून विवाहाच्या मंगल नात्याचा आदर करायला काय हरकत आहे.

मंगळसूत्र महोत्सव बघून थोडेसे धक्का ग्रस्त माझे मन मंगळसुत्रचा महिम्याने सावरले.

मंगलधाग्यांच्या, मंगल नात्याचे
प्रतीक आपण जपायचे.
चार काळे मणी महत्वाचे
मंगळसूत्राला सौभाग्य मानायचे.

# ६१ काय बोलावे?

काय बोलावे व काय बोलू नये
कुठे थांबावे, कुठे थांबू नये,
सांगणाऱ्याला अधिकार नसतो
बोलणाऱ्याला संस्कार नसतो!

काय बोलावे कितपत बोलावे या गोष्टी कोणत्याही शाळेत शिकवल्या जात नाहीत, खरे तर बोलताना तारतम्य बाळगणे आवश्यक आहे हे जाणणारे फार थोडे असतात. मुद्दाम सभेत एखाद्याचा अपमान करणे, एखादीला सुंदर स्त्री, गोरी स्त्री म्हणणे उद्धटपणाचे लक्षण आहे. संभेमध्ये औपचारिक व कार्यालयीन गोष्टीं बद्दलच बोलावे. श्रोते किंवा कर्मचारी याना  बिग बॉसची बदनामी होऊ नये म्हणून  त्रासिक भाव चेहऱ्यावर न आणता ऐकून घ्यावे लागते. तीच तीच गोष्ट आपण किती वेळा यापूर्वी सांगितली आहे याचे भान न ठेवता रेकॉर्ड पुन्हा पुन्हा वाजवणारे साहेब काय साध्य करतात? कुठल्याही कार्यक्रमासाठी नियोजन लेखन आणि पूर्वतयारी न करता त्याच त्या गोष्टी उगाळणारे सुद्धा असतात. त्यांच्या वागणुकीत दंभ व अहंकार असतो.

दुसऱ्याला हे करा ते करा, तुमच्याकडे फार शक्ती आहे वगैरे सांगणारे, स्वतःहुन वेगळेच वागतात. खर्च कमी करा असे इतरांना सांगणाऱ्याच्या ऑफिस मध्ये गरज नसताना पंखे एसी, दिवे चालू असतात. मिठाईची रेलचेल असते, फार मोठ्या प्रमाणात पार्ट्या असतात. पंक्ती झडत असतात. त्याच ठिकाणी खर्च कमी करा सांगत साहेब शुद्ध स्वतः जिलब्या खात इतरांना खिडची खायला देतात. कर्मचाऱ्याच्या क्लब भरलेला असतो. खी खी चालू असते. जे बोलताना विषय संदर्भ सोडून भरकटत जात असेल तर तुम्ही बोलणे बंद करावे. काहीजण जास्ती वेळ बोलल्यावर बोबडे बोलू लागतात. पण इतरांना ऐकण्याची शिक्षा सोसावी लागते. ऑफिस मधील भेट असो



किंवा खाजगी असो सभ्यतेच्या मर्यादा सोडू नये. महिलांचा त्यांच्या आडनावाने किंवा मॅडम म्हणावे. एखाद्या स्त्री चा उल्लेख तिच्या पहिल्या नावाने केल्यास लोक मागे नावे ठेवतात. एवढा मोठा "कौन बनेगा करोडपती" चा शो मात्र तेथे श्रीयुत अमिताभ बच्चन "देवी और सज्जानो" म्हणतात. तेवढ्या पुरते तेवढेच हजरजबाबी बोलून औपचारिकतेच्या योग्य मर्यादा सांभाळतात. काय बोलू नये ते आपल्याला कळते काय बोलावे हे सुद्धा कळायला हवे. व वळायला हवे. काय बोलायचे?

# ६२ कुठे थांबावे?

पूर्वी पांथस्थ किंवा वाटसरू रस्त्याने मार्गक्रमण करताना ज्यावेळी थकवा येईल तेव्हा थांबत असे. पाणथळ जागा, हिरवे झाड, एखाद्या जलाशय बघून क्षणभर विश्रांती घेतली जाई. पुढे धोका असेल अस्थिर परिस्थिती युद्धभूमी असेल तर धर्मशाळेत देवळात, किंवा तात्पुरता तंबू ठोकून मुक्काम केला जाई.

दो गज जमीन के नीचे" या कथेत "सूर्यास्ता पर्यंत, पाळल्या नंतर जेवढे अंतर तू कपल्स ती जमीन तुझी असा वर मिळाल्यावर नायक पळत सुटतो. आणि शेवटी खाली कोसळतो. जेवढ्या जमिनीत त्याला पुरतात तेव्हडी दोन हात जमीन त्याची होती. त्याला मिळते. बाकी सर्व जमीन आणि त्याचा जगण्याचा अनमोल हक्क तो इहलोकीच्या सोडून जातो. सहलीसाठी साठवलेले पैसे तसेच राहतात. मंदिराच्या गर्भगृहात दागिने उरतात. लहानपणी आपण रस्त्यावर सापडलेली सिगारेटची पाकिटे गोळा करायचो. त्या चंदेरी चकचकत्या चांदीची आपल्याला केवढे आकर्षण वाटायचे. एकमेकांना आपण तुझ्याकडे किती पाकिटे जमली असे विचारात एकमेकांचा हेवादावा करीत असू. आज तुझ्या कडे किती गाड्या आहेत? बंगले किती आहेत? सोने नाणे किती आहे? असे प्रश्न विचारतो. आरोग्य, जीवनाची दिशी, समाधान या बद्दल बोलत नाही. त्यावेळी त्या सिगारेटच्या पाकिटांचे पुढे काय झाले? आठवते? माहित नाही. त्या सिगारेटच्या पाकिटांचे मोल काय होते? जजवळजवळ काहीच नाही. आज ती संपत्ती अनमोल वाटते आहे ती उद्या इथंच राहणार आहे. आपण स्वतःची काळजी घेणे खूपच आवश्यक आहे. कुठे तरी क्षणभर विश्रांती वरेक किंवा स्वल्पविराम हवा. सॅन माणसाला हेच सांगतात.

आनेवाले कल कि खातीर<br>
याजक ये पाल मत खोना

पूर्णविराम तर ठरलेलाच आहे. त्यापूर्वी आहे त्या सुखाचा उपभोग घेऊ या आमची आई मरताना म्हणायची एक दिवाळी माझ्या मुलाच्या घरी मुंबईला करायची आहे. पुढच्या वर्षी असे म्हणाली. हे जग सोडून गेली. पूर्णविराम येण्यापूर्वी कुठे थांबावे हे जाणून घ्या हि दिवाळी आपल्या आप्तेष्टां सोबत आनंदाने घालावा.



## ६३ "एखादे जण"

आनंद चितपट राजेश खन्ना अनोळखी व्यक्तीला बाबू मोशाय म्हणून हाक मारून मैत्री करतो. आपलीही एखादी खास मैत्रीण असावी हि इच्छा असतेच.

असे एखादे जण असावे
ज्याला आपले आपले म्हणावे
बऱ्याच दिवसात भेट नाही
म्हणून उसासे सोडावे
विचारणा करीत असताना
"या या "म्हणणाऱ्यानेच यावे ||

जेवण करूनच निघायचे
मनाने ठरवून सांगून टाकावे
हे "जण" हि व्यक्ती शोधून
सापडली नाही. गेले राहून
मग मी शोधली पुस्तके
मला मिळाले, खूप मित्र जीवेभावे ||

मैत्रीण - एक मैत्रीण पुरेशी असते,
अंधार दूर पळवायला
कांदे बटाटे, भाजीपाला यातच सारा जन्म गेला
चांदण्यात फिरायचो दोघे , आठव किती काळ झाला
आता मी कट्ट्यावर शोधते अनोळखी हात
मैत्रीसाठी आसुसत राहते रोजच आतल्या आत ||

हि मैत्रीण कन्या सुपुत्री असू शकते, हि मैत्रीण एखादी व्यक्ती सहकारी असू शकते. नातेवाईक असू शकते. पुस्तक असू शकते. पण कन्या श्रेष्ठच!

कन्या व्हावी ऐसी प्रेम आईसम देईल अशी'
कन्या कोवळी काली आणेल कुळाला झळाळी
कन्या श्रेष्ठ हार पावली आहे उद्याची माउली

निर्णयाचा हक्क स्त्रीला नसतो. समाज पुरुष हा चहा तर स्त्री उरलेला कुच्च मानतो.

त्यामुळे स्त्री हि नेहमीच सज्जन व सन्मान्य मार्गाने मैत्रीण शोधते. हि मैत्रीण कन्या असते.

दैवी संकेत तुडवू नका. मुलाचं जन्म अडवू नका

अक्कल आपली लावू नका, मुलाचा ढोल बडवू नका.

मुली असेल अफसर बेटी, खरी बनेल धनाची पेटी

"मुंगी आणि राव आम्हा सारखाची देव" असे संत म्हणतात. आपण मात्र मानव जातीतील स्त्री व पुरुष यांच्यात भेद करतो. ते एखादे जण स्त्री पुरुष कन्या-पुत्र, बहीण-भाऊ, तिऱ्हाईत सुद्धा असू शकते.



## ६४ नवी सकाळ

नवी सकाळ हि नेहमीच सुंदर असते. तिच्यात अनिश्चितता असू शकते. दिवसाची जलद गती तिच्याकडे नसते. केवळ वर येण्यापूर्वीची वेळ म्हणजे उषःकाल असे अजिबात म्हटले जात नाही. तांबडे फुटले, उषःकाल झाला. दिवस उगवला सहा शब्दात त्या पहाटेचे नव्या नव्या सकाळचे वर्णन करता येते. त्यावेळी आपण आपलेच असतो. आपल्या त्या खास वेळात इतर कुणी वाटेकरी नसतो.

फार फार पूर्वी दिवसाची सुरुवात भूपालीने केली जाई. मंदिरा मधील घंटानाद, आरती, भजने ऐकू येत असत. त्या नंतरच्या काळात रेडिओची धून बातम्यांचे आवाज ऐकू येत असत.नंतर झाडांच्या त्या शेंड्यावर नंतर अंगणात व नंतर पडवीवर तो सूर्यप्रकाश हजार होई. तावदानावरून तो प्रकाश उष्ण होऊन घराला जाग आणी. हल्ली सकाळी वर्तमानपत्र येते जे पूर्ण जगाच्या संपर्कात आपले घर आणते. त्या वर्तमानपत्रासोबत येतो वाफ़ाळलात चहा, जो शरीलाला गात्रांना जागृती आणतो. अंघोळीने खऱ्या अर्थाने पारोसेपण संपतं नवेपण सुरु होते. आपण नवे होतो. जुना डाव मोडू नये असे आपल्याला या सकाळीच वाटते. ताजी सकाळ नवी सकाळ तिचा आनंद घेऊन बघा.

गजबजलेल्या रस्त्यावर माणूस काही गोष्टी हरवून बसतो. त्या कोलाहलात काहीतरी हरवरूनच जाते. मात्र सकाळ एक सुंदर भेट देते.

मला हे केव्हा कळले?<br>
डोंगरदारीचे सोडून नाते<br>
पल्लव पाचूचे सोडूनि घरटे<br>
सुख दुःखाची अशी सारखी<br>
प्रीत जीवन ओढ लावते.

सूर्य प्रकाशात मिळणार आनंद व तेज व ऊर्जा मोजतात येणे शक्य नाही. तारकांचे अक्ष जितके सुंदर दिसते तितकेच हे सोनमोहोर अंगावर पान्घनरलेले सकाळचे आकाशही सुंदर दिसते. नवा दिवस हा एखादे नवीन बक्षीस , एखाद नवीन गिफ्ट घेऊन यावा. पॉलिसी विथ ऍडेड बेनिफिट अँड मस्ट नॉट बी अ पनिशमेंट. नव्या दिवसात नवीन काहीतरी घालेल हि अशा असते. देवाचे आशीर्वाद असतो. श्वासात सकाळ भरून घेऊन आपण आपल्या जागेपणच आनंद घेतो. पृथ्वी म्हंजे लेक लाडकी या घराची तर सूर्यनारायण म्हंजे जावई लाडके या घराचे. तोच तो आळस किती दिवस बाळगणार? नव्या सकाळचा आनंद काही घेणार? शुभप्रभात ! गुड मॉर्निंग !

# ६५ देव आणी आनंद

देव काही जणांना असे उमदेव्यक्तिमत्व देतो आणी केवळ एकट्या देवानंदला चिरतारुण्याचे वरदान देतो. देव आनंदच जन्म 1910 सालचा आज. त्याच्या बरोबर काम केलेले अनेक कलाकार काळाच्या पडद्याआड गेले. पण देव आनंद अजून चित्रपट निर्मिती क्षेत्रात आहे. त्याचा नवीन चित्रपट कमांडर येत आहे. त्यात त्याची भूमिका सुद्धा आहे. देव आनंदचे चितपट व देव आनंदच्या नायिका हा नेहमी चर्चेचा विषय असे. चित्रपटात त्याने ब्रेक दिल्यावर त्या नवोदित नायिकेचे भाग्यच उजेडात असे. वहिदा रहमान, जाहिरा, मुमताज, झीनत अमान, टीना मुनीम, हि उदाहरणे आहेत. वयाने खूप लाह्या नातींबरोबर सुद्धा देव बिनधास्तपणे वावरत असे. वन ट्री हिल म्हणजे उंच टेकडीवरील एकाच देखणे झाड अशा शब्दात देव आनंदचे वर्णन करता येईल. त्याच्या नंतर आलेले नातं भिनते आरोग्याच्या तक्रारी घेऊन वावरताना देव आनंद मात्र चिरतरुण राहिला. चॉकलेट हिरो, रोमँटिक हिरो, परदेशी नातीला घेऊन चित्रपट करणारा हिरो, वेगळ्या विषयांची ओळख करून देणारा दिग्दर्शक अशीही त्याची ओळख आहे. "लंके पहला पहला प्यार" अशा शब्दांमध्ये जुन्या आठवणी दूर ढकलून देव आनंद दुडू दुडू धावतच राहिला. हरेकृष्ण हरेराम, गाईड, प्रेमपुजारी, हे त्याच्या करियर मधले महत्वाचे टप्पे होते. आज पूर्णविराम आला " क्या से क्या हो गया, तेरे प्यार मे" असे म्हणणारा गाईड मधील देव आनंद काहीच खरा नव्हता.

मैं जिंदगी का साथ निभता चला गया
हर फिक्र को धुवे मे उडत चला गया

असे म्हणणारा देव आनंद हाच खरा चेहरा देव आनंदाचा आहे. त्याची आनंदी खिलाडू वृत्तीची हाच त्याच्या चिरयौवनाचा मूळ मंत्र असावा. एका मुलाखतीत त्याने मध व अल्पाहार हे त्याच्या चांगल्या तब्बेतीची रहस्य सांगितले आहे. सौदर्य व कला यांची आसक्ती आज या वयात सुद्धा देव आनंदने जोपासली आहे. जीवन गौरव



पुरस्काराने सन्मानित देव आनंद बद्दल शांता शेळकेंनी केलेली एक कविता. वाचनात आली.

आनंदाच्या अमरलतेवर  फुल उमलले एक अचानक

मधुमासाचे तया चुंबिता, रजत पटाचे  बनले कौतुक

चैतन्याचा झरा नाचरा. तारुण्याचे क्षितिज मनोहर

त्याचे हसणे, त्याचे गाणे, प्रसन्नतेला फुटला अंकुर

असा देव आनंद साजरा, जसा कधी त्याला स्पर्शीला

पिढ्यानी पिढ्यांची स्वप्ने ज्याच्या स्मरणे सतत हर्षाली
शांता शेळके
देव आनंद असा हा संयोग म्हणजे चिरतारुण्य होय.

## ६६. 201६ चा शेवटचा दिवस गोड़ व्हावा

ज्याचा शेवट गोड़ ते सारेच गोड़ अशी एक म्हण आहे. जुन्या वर्षाची हि आकृती पाठमोरे पुढे पुढे जात आहे. आठवणींचे, घटनांचे, जुन्या जीर्ण अशा बारा महिन्यांचे गाठोडे घेऊन ती आकृती पुढे जाते आहे. 2015 वर्ष पुढे जाऊन 2016 चे वर्ष घेऊन येणार आहे किंवा स्वतः जाऊन नववर्षाला जागा देणार आहे.2016 नवी स्वप्ने घेऊन येणार आहे. 2014 जाऊन अंतराळात विलीन होणार आहे. जन पळभर म्हणतील हाय हाय, मी जाता पुसतील कार्य काय? नवीन वर्षात यश मिळे, काही शंका दूर ठेवून आपण नव्या वर्षाचे स्वागत करीत असतो. या वर्षाच्या बरोबर त्याने आपल्यासाठी आणलेल्या बक्षिसात, गिफ्ट बॉक्स मध्ये काय आहे? एक उम्मीद, नवीन वर्ष सुखी जाण्याची उम्मीद! जणू ह्या वर्षात एक यशाची गुरुकिल्ली आहे. चैत्री पाडव्याला हिंदूंचे नाव वर्ष सुरु होते. जुने जाऊ द्या मरणालागुनी म्हणून आपण मृत्यूचा हि आदर करतो. दिवाळीत यम द्वितियेला यमाची, यमराजाची पूजा करतो. वेगवेगळ्या नाटकांमध्ये हि मृत्यबद्दल चर्चा असते. उदा. इच्छा मरण(चर्चा ) एकूण मृत्यू बद्दल आपण फारसे बोलत नाही. "जाणे" एवढेच बोलतो. जुने वर्ष असेच जाणार आहे. मृत्यूच्या मिठीत, अजब असा पूर्ण विराम घेऊन 2015 निघून जाईल. मात्र 2016 ला पाठवेल

पांघरशी जरी असला कपडा
येशी उघडा जशी उघडा
कपड्याची करिशी नाटक
तीन प्रवेशाचे

या तीन प्रवेशाच्या नाटकातील एक भाग, एक वर्ष संपते आहे. जुन्या वर्षाची आठवण तीन चार दिवस येईल, 2016 ऐवजी चकून 2015 साल टाकले जाईल, लिहिले जाईल, नंतर आपण 2016 शी परिचित होऊ, 2015 ला आनंदाने निरोप द्या आणि 2016 चा शेवट गोड़ व्हावा 2015 ला आनंदाने निरोप द्या. 2016 चे स्वागत करा. हॅपी न्यू इयर 2016 (पाडाव्या पासूनचे सामान्यतः जीवन हे ट्रीनिटीचे 3 डी असते. एक मिती संपते एक जाते, एक चालू असते, एक येणार असते. भूतकाळ स्मृती हा आऊट डेटेड चेक भविष्य काळाची हुंडी आहे. नवे तसे काहीच नसते.



## ६७ शेवटचा दिवस गोड़ व्हावा

विठ्ठल नाम घेताना त्या पंढरीच्या राजाचे रूप नजरे समोर येते.
कानडा राजा पंढरीचा.
परब्रम्ह भक्ती साठी उभा ठाकला भीमेकाठी
उभा राहिला भाव सावयव जणू पुंडलिकाच्या
कानडा राजा पंढरीचा
हा नामयाची खीर चाखतो
चोखोबांची गुरे राखतो.
पुरंदरचा हा परमात्मा वाली दामाजीचा||
कानडा राजा पंढरीचा

पंढरपूर वरील जाणे, गळयात विठ्ठलाची माळ घालणे त्या विठ्ठलाच्या स्मरणाचा हृदय नाद त्रिभुवनी जपणे हि भक्ती परमसुखाची निधाने आहेत.

विठ्ठल नाम जपण्यात परमसुख असते. तुळशीमाळ गळा कर ठेवून कटी

कासे पितांबर कस्तुरी लल्लाटी अशी ती विठ्ठल मूर्ती भक्ताला सद् देत राहते. विटेवर स्थिर उभा असा तो विठ्ठल पामरांना स्थिर राहण्याचे मन शांत ठेवण्याचे संसारात सुद्धा अलिप्त राहण्याचा संदेश देतो.

नाम स्मरणाची माहिती सर्व कालीन आहे. धर्म ग्रंथामध्ये हि त्या जप महिम्या बद्दल लिहले आहे. विठ्ठल नामाचा गजर हा मनात आनंद लहरी उत्पन्न करतो. ओले ठसे उमटवणारे शब्द जपून ठेवावे तसे हे विठ्ठल नामाचे ठसे घेणंच पैलतीरी जायचे असते. विठ्ठल नाम जणू वल्ह्या प्रमाणे देहाच्या नावेतून परमार्थाच्या किनारी नेते. जीवांच्या दगदगीत वाळूच्या कणा सारखे दिवस उडून जातात. आयुष्याची तिन्ही सांज होते व विठ्ठल नामाचा टाहो अधिकच वाढतो.

बसू नकोस राणी होऊन केविलवाणी
डोळयात सांजवेळी आणू नकोस पाणी

जगण्याचे दिवस, राहण्याचे दिवस उरण्याचे दिवस सरत आले आहेत. शेवटचा दिवस गोड़ व्हावा हि त्या विठ्ठल चरणी प्रार्थना.

# ६८ टायर रोटेशन

टायर रोटेशन म्हणजे गाडीची टायर्स बदलणे. आपण त्याच्या टायर रोटेशन म्हणजे थकल्यावर कामात करायचा बदल असाही उल्लेख करू शकतो. नात्यात, नोकरीत असा बदल हवा. नात्यांच्या सर्व्हिसिंगच्या शीर्षका खाली एक लेख वाचला होता. त्यात टायर रोटेशनचा उल्लेख आहे. काही वर्षा नंतर जेव्हा टायर्स घासून गुळगुळीत होतात तेव्हा पुढची टायर्स मागे व मागची पुढे लावली जातात. त्यामुळे कमी झिजलेली चाके जोरात धावतात व अधिक झिजलेल्या चाकांना आराम मिळतो.

पती पत्नी म्हणजे संसाररूपी रथाची दोन चाके असतात. असा उल्लेख नेहमी केला जातो. या दोन चाकणमध्ये सुद्धा एक चाक जास्त भासले जाते. अर्थार्जनासाठी कष्ट करणारा पुरुष व गृहकृत्यदक्ष  पत्नी या मध्ये शारीरिक कष्ट  वेगवेगळे असतात. पूर्वी शेतीची कामे करताना पुरुष कधिक आत्तापेक्षा अधिक कष्ट करीत असे. स्त्रीची शारीरिक शक्ती मूलतःच कमी असल्याने शारीरिक कष्टाची कामे केल्यास तिच्या शरीराची झपाट्याने झीज होते.

कर्त्या पुरुषा साठी चांगला आहार तयार करणारी स्त्री स्वतःच्या आरोग्याकडे दुर्लक्ष करते. काही वर्षानंतर दोघांनीही सारखाच पौष्टिक आहार घ्यायला हवा.

छंदाचेही असेच असते. बाईच्या जातील कसे छंद? "घराचे होत नाही हिला, निघाली गायन शिकायला." अशा शब्दात तिचे छंदांची अवहेलना होते. भजनी मंडळ, एखादी संस्था, एखादी वैचारिक सात या सर्वांच्या मदतीने स्त्री सुद्धा आपला छंद जपू शकते. लग्नातील गाणी, भजने, अंगाई, डोहाळेजेवणातील  गीते, यातून गायनाचा छंद जपला जातो. तर रांगोळी, वारली चित्रकला, साड्यांवरील भरतकाम, यातून चित्रकलेचा छंद जपला जातो. कामातील बदल असे या टायर रोटेशनचा अर्थ काढता येतो.

एखादी तीर्थयात्रा किंवा पर्यटन, नातेवाईकांच्या भेटीगाठी, या रूपाने हवा पालट, जागा बदल, करून टायर रोटेशन महत्वाचे असते. नोकरीत तेच ते काम करून येणार कंटाळा, टाळण्यासाठी रोटेशन केले जाते. टायर रोटेशन निर्जीव वस्तूं इतकेच मानवी जीवनात सुद्धा लाभदायी ठरते.



## ६९ चैतन्याचा दिवा

जीवनाचा संबंध चैतन्याशी असतो. अंधाराचा संबंध अचेतनाशी होतो. अंधारावर मत प्रकाशाचं करू शकतो.

म्हणूनच दिव्या दिव्या दिपत्कार
कानी कुणाला मोती हार- म्हटले जाते.

दिवाळी हा प्रकाशाचा सण संपल्यावर, परदेशीयांचा ख्रिसमस येतो. त्यावेळी सुद्धा रोषणाई केली जाते. थोडक्यात काय अंधार दूर पळवणे, सर्वांनी एकत्र जमून नवीन अशा पल्लवित करणे हाच सणांचा अर्थ असतो. तिन्ही सांजेला देवा जवळ दिवा लावला जातो. अंगणात पणती लावणे, यात प्रकाशाचा गौरव असतो. वाटसरूंना उजेड दिसून रास्ता कळवा. जंगली जनावरांपासून संरक्षण, उजेडामुळे वाटणारी एक सुरक्षितता अशा अनेक आशावादी घटनांशी व भावनांशी त्या दिव्याचा संबंध जोडलेला असतो. जीवनाला प्रवास म्हणतात.

पायाखालच्या जुन्या दिशा जरी हरवल्या अशा
तरी नव्या वाट घेतील त्यांची जागा
आणि प्रत्येक नव्या वळणारवर
पुन्हा असतील डवरलेल्या अनोख्या फुलबाग.
क्षणभर विश्रांती नंतर मी पुन्हा चालू लागेन
तेव्हा नव्या वाटेवरून चालू लागेन
हातातील दिवस फक्त विझू नये
जीवनातील चैतन्याचा प्रकाश सरू  नये
चैतन्याचा दिवा घेऊन चला
नवनवीन वाटांवर प्रकाश पसारा.

दिव्यांच्या अमावास्येला सुद्धा आपण दिव्यांचे पूजन करतो. प्रकाशदायी  दिव्याचे पण किती प्रकार असतात. निरंजन, लामणदिवा, सामी, पणती, देवदास दिवा, अक्षय दीप, पलिते, मशाली अशा वेगवेगळया आकाराच्या व प्रकारच्या

दिव्यांना सर्वच धर्माच्या उत्सवात फार महत्वाचे स्थान असते. हिंदूंचा आकाशदीप, ख्रिश्चनचा तो स्टार (चांदणीच्या आकाराचा आकाशदिवा) दिव्यांची माळ अशा दिव्यांच्या सजावटीशिवाय सण पूर्ण होताच नाही. शरीररूपी कंदिलाच्या काचेवरची काजळाची झटकून, कोनाड्यात जळमट काढून धुरकट भिंती स्वच्छ रंगवून रांगोळया काढून दिव्यांचे स्वागत व प्रकाशाचे स्वागत केले जाते. हा उत्सव चैतन्याच्या दिव्याचा उत्सव असतो जीवनाचा! कोटी दिवाळया दसरा आम्ही हेच झाले पुरे

घरोघरी ओवाळणी विठ्ठल देखिला नयनी
पाजळलं दिपू फिटला अंधकार अमृतमनी!



# ७० दिवसांचे रकाने

प्रत्येक तारखेला कॅलेंडर मध्ये एक रकाना रिकामी जागा असते. जरी काही दिवस संपत संपत नाहीत मोजून नाईलाजानेच ते दिवस काढावे लागतात तेही. दिवस तसे दिवाळीचेच होते. हवेत थोडासा गारवा होता पण विदर्भातील त्या विभागात रखरखाट जाणवत होता. माझे नेरपिंगलाई देवी जवळच्या खंडावर बसून मावळतीचा सूर्य निरखाने चालू होते, तेवढ्या एक ट्रक जवळ येऊन थांबला. ट्रकच्या ड्रॉयव्हरने मागची फळी उघडली त्यातून एक स्टूल काढला, त्या स्टुलवरून उतरून 4/5 मुली 2/3 मुले उतरली. नंतर वृद्ध आई वडील उतरले. सर्वजण दर्शन घेऊन आले. खाली सतरंजी टाकली. स्टोव्ह काढला. त्याच्या सोबत एक कढई व तवा होता. कढईत पिठलं केले, तव्यावर भरारी केल्या, वर्तमानपत्राच्या कागदावर जेवण केली व करावा पुन्हा पुढे निघाला. अगदी अतिसामान्य घरातील कुटुंब होते पण त्यांना जणू आनंदाची पेटिका सापडली होती. अमरावतीच्या अंबादेवी जवळ तेच. स्टुलवरून पुन्हा कुटुंब वर चढले, तेव्हा त्यांच्यातील एकजण म्हणाला बेसन संपले आहे. ते घ्या आजी म्हणाली मी राखण राहते. तुम्ही फिरून या. एका बिंपोल प्रमाणे फक्त वेळ उभी राहावी म्हणून आधाराला लावलेल्या काठी प्रमाणे ती व्यक्ती नुसती असते, पण निरुपयोगी नसते. अन्यथा फक्त दूरदर्शन वरच्या मालिका बघून वेळ काढणाऱ्या महिला काहीच सध्या करीत नाहीत काही घरी तर पुरुषसुद्धा अशा मालिकांच्या व्यसनात गुंतू लागले असताना ती आजी ते सर्व राखत बसली. तिने कांदे कापले, दूध विकत घेतले, चटईवर आडवी पसरली. आजींना मी बोलते केले तेव्हा म्हणाल्या, "महागड्या भाज्या व पसारा परवडणार नाही, सत्तावीस जण, हा ट्रक, कांदे बेसन भाकरीचे पीठ व सतरंजी यावर आमची हि सहल आहे. कारचायला पैसे नाही. मात्र दिवाळीची मजा, जमलेल्या मुलांना सहलीची गम्मत आणि आम्हाला दूरदर्शनच्या त्रासातून सुटका आणि देवदर्शनचे पुण्य मिळते. अगदी एखाद्या दिवशी खिचडी करतो. चहा रोज करतो. खर्च कमी ठेवतो. वर्षभर आम्ही या सहलीची चर्चा करतो. दिवाळीत घर लहान असते म्हणून एकत्र जमत येत नाही. गृहिणी घरकाम करत राहते त्यापेक्षा अशा सहलींना

मजा येते. एखाद्या देवळात औक्षण करून घेतो.फराळाचे महागडे पदार्थ करण्या ऐवजी लाडू चिवडा सोबत घेतो. एखाद्या देवळा समोर या पोरी रांगोळी काढतात. चार भिंतींनीच घर बनते काय? जिथे सोबत आपली माणसे आहेत तिथे आनंदाने दिवाळी साजरी करायची. मी दिवसांचे रकाने भरताना कधी कधी त्या आजींची आठवण काढते. आला दिवस साजरा करायचे म्हणजे रकाने भरतात!



## ७१ मी तुम्हाला विचारतेय?

मी जेव्हा स्त्री भ्रूण हत्येवर एकपात्री प्रयोग करायचा ठरवलं तेव्हा तो विषय नाकारला गेला. एक मुलगी माझ्या मनाच्या कोपऱ्यात रडत बसलेली मला नेहमीच दिसते व मी ब्लॅक होण्याचे टेन्शन भल्या भल्याना असते पण त्या क्षणी मला अस्तित्वच राहत नाही. समोर प्रेक्षक उठोत बसवत, काही फरक पडत नाही. हे खरे नाही. गेले असतील काही टॉयलेट ला म्हणू शकत नाही एकपात्री हा आपला एकट्याचाच मार्ग असतो. त्याला साथीला कुणी नसते. वाटेकरी नसते ते वाल्याकडून पैसे वसूल करायची वृत्ती असते.

बिघडले ते सोडून द्यावे! जाऊ दे गेले उडत " असो किती जणांना तुम्ही उडत पाठवता? खरेतर तुटलेल्या तारांना जोडता येत नाही. नुकसान होते. पण मन मारून "मजबुरी का नाम महात्मा गांधी" असे जुळवून घ्यावे लागते.

पत्रकार व कलाकार या दोन डगरींवर पाय ठेवून तोल जाण्याची भीती होती, पण मला पर्यायच नव्हता. हा ओरखडा मला फार दुखावून गेला. मनातील लहान मुलांच्या रडण्याने वैतागू नये. त्याला शांत करणे शक्य नसेल तर त्याच्या कडे दुर्लक्ष करावे हे खरे आहे. पण हा ओरखडा माझ्या अस्मितेवर पडला.

लोकांना बाई हवी असते ती शरीर म्हणून! मुलगी मॅडम, बॉस, अशा रूपात ती अली कि त्यांचा अहंकार दुखावला जातो. स्त्रियांना त्यांचा रास्त हक्क व सन्मान देण्याची इच्छा या लोकांची नसते. "बाया तिथे बुवा" असे बायकामागे जायचे व्यवच्छेदक लक्षण त्यांच्यात नसते. महिलांचे यौगडां जाणून घेण्यात समाज नेहमीच मागे असतो. महाराष्ट्रात नव्हे तर भारतात नव्हे तर परदेशात सुद्धा "मुली नको" हि भावना किया यावी? पुरुषांच्या अहंकाराचे काटे स्त्रियांना का टोचावे?

स्त्री भ्रूण हत्ये बद्दल लिहिले जात नाही
त्या बद्दल बोलणेही टाळले जाते.

बौद्धिक चर्चा करताना स्त्री हि घरकुल जुंपली जाते. तुला काय कळते? गप्प बस! असे म्हणून स्त्रीचे विचार मारले जातात.

आज मला स्त्री भ्रूण हत्या थांबविण्यासाठी काही करावेसे वाटते. मी माझा "क्या इराणी बरी हू मै माँ बाबा " हा प्रयोग त्या साठीच बसवला पण त्या प्रयोगाला सुद्धा गर्भातच मरण पावावे लागले. स्त्री भ्रूण हत्या विरोधात जागृतीची हत्या होते. याला पर्याय काय? मी तुम्हाला विचारते आहे?



# ७२ गोविंदा रे गोपाळा

श्रावण शुद्ध सप्तमी या अष्टमीला श्रीकृष्ण जन्मोत्सव व गोपाळकाला जे सण साजरे केले जातात. श्रीकृष्णच्या बाललीला ज्ञात असल्या कारणाने आणि बाळकृष्णाची पूजन घरोघरी केले जात असल्या करणारे श्रीकृष्ण हा खऱ्या अर्थाने उत्पत्ती -स्थिती- लय या तीन अवस्थांमधील उत्पत्तीची जी अवस्था त्या अवस्थेतला देव मानायला हरकत नसावी.

देवकीसुत गोविंदम वासुदेव जगत्पते
देही मी सर्व सुखं त्वाम महा शरणं व्रज

असे म्हणून आपण भौतिक सुख मागतो. म्हणून तो स्थिती अवस्थेचाही देव ठरतो. सर्व गोष्टी कृष्णर्पणम अस्तु म्हणून आपण श्रीकृष्णाच्या चरणी अर्पण करतो. म्हणून श्रीकृणां हा "लय" या अवस्थेचाही देव ठरतो. गुरख्यांचा देव अशा शब्दात त्याचे वर्णन केले तरी तो आपलासा वाटणारा देव आहे. गरीब सुदाम्याच्या घरी पोहे खाणारा, मित्रांवर प्रेम करणारा, कृष्ण शिष्टायी चर्चा करून भांडणे, वादावादी सोडवणारा, आपल्याशी संवाद साधणारा देव वाटतो. युद्धभूमीवर गीता "श्रीमद भगवतगीता" सांगून श्रीकृष्णाने सामान्यांना जगण्याचेच मार्गदर्शन केले आहे.

कालियाचा वध करणारे, घोर संकट काळी गोवर्धन पर्वत करंगळीवर उचलणारे श्रीकृष्ण भगवान मला संकटात पार करणार नाहीत का? जरूर करतील हि श्रद्धा वाटावी अशाच "श्री कृष्ण लीला " आहेत.

दही दूध लोणी खाणारा, मस्ती करणारा बाळकृष्ण, गोपालकृष्ण सोन्याची बेटे, द्वारका राखतो, म्हणजे तो वैभवशाली देशील आहे. सुदर्शन चक्राने तो शत्रूचा वाढ करू शकतो. त्याच्यात इतकी शक्ती आहे, सामर्थ्य आहे म्हणून तो संकट नाशक देखील आहे.

तुरे कांबळा, डांगेवरी विषाण वेणू घेऊन करी
वैजयंती रुळे कैशी वक्ष स्थळावर
गोविंदु वो पैल गोपाळू माये

सुरतरू तळवटी देखे कैसे उभा आहे.

खंडावर कांबळे, मस्तकी मोरपिसांचा तुरा, हातात बासरी ,व विषाण वाद्य व वक्ष स्थळावर रुळणारी तुळशीची माळ. कदंब वृक्षातळी वृंदावनात, गोपाळांसोबत माझा श्रीकृष्ण उभा आहे.(ज्ञानदेवांचे अभंग)

भक्त जसा कल्पेल तास हा देव आहे. त्याला मीरेची भक्ती हि आवडते व राधेची हि आवडते. म्हणूनच

राधा का भी शाम

मीरा का भी शाम म्हणतात

गोधन पशुधनाचे महत्व सांगणारा श्रीकृष्ण कठीण भक्ती सांगत नाही. झेपेल तशी भक्ती हि केली तरीही श्रीकृष्ण भगवान पावतात. यमुनेच्या तीरावर कृष्ण मुरारीच्या मधुर सुरांनी गायी लुब्ध झाल्या. गोपिका कामधाम विसरल्या. या सर्वनाचे मधुराभक्तीचे नटे आहे. हा देह श्रीकृष्णाचे घर आहे.

चौकटी बाहेर पडून निसर्गाशी घट्टमुट्ट मैत्री करावी असे सगळयांनाच वाटते, पण रानफ़ुलांशी मैत्री करायला, जंगल वाचायला विस्तार हि संस्था एका निमित्तच आहे. ज्या मार्फत हे शक्य आहे. अन्यथा वेळच मिळत नाही.

"कास रंगी रंगले मन" या कार्यक्रमात वरचेच विचार अधोरेखित केले होते.

जागतिक वारसा असलेले कासचे पठार पश्चिम घाटाच्या सौदर्याचा मुकुटमणीच आहे. कास पठारावरील वेगवेगळी फुले कारवी, तेरडा, रानफुले यांची सुंदर माहिती फोटोसह त्यांनी दिली. पावसाळयात निसर्ग खूपच रम्य होतो, त्यात अजून हिरवा शालू लेवून नटतो. नेचरनट्स द्वारे निसर्गाशी संवाद साधने, पर्यावरणाशी मैत्री करणे. सहज शक्य आहे. नजरेने त्या दृश्यांचे चित्रीकरण पाहताना वाटले, आपणसुद्धा त्या फुलांचा गावाला जावे.

कास पुष्प पठारावर अनेक संस्थांतर्फे सहली जाणार आहेत.

जाऊ या का?



# ७३दोन घरटी

ऑफिसला  सहसा कुणी घरटे म्हणत नाही. ते वरवरचे कार्यालयच असते. नोकरदार माणसे व नोकरपेक्षा लोकांचा अधिकाधिक काळ ऑफिस मधेच जातो. हे घरटे सुंदर होते का? कि या घरट्याला फक्त ऑफिस म्हणावे असा प्रश्न स्वतःच्या मनाला विचारल्यास  50% लोकांना ऑफिस मध्ये खूप समजून घेतले जाते मायेची उब मिळते व ते ऑफिस त्यांना घरच वाटते. 50% कंटाळल्यावर विस्कटलेल्या त्या घरट्याच्या काड्या कशाबश्या कशातरी एकत्र होत्या असे म्हणतात. एका छोट्याश्या धक्क्याने त्या विस्कटलेल्या ते विखुरलेले अवशेष गोळा करण्याचे हि त्राण माझ्यात नव्हते. ते घरटे मी तसेच सोडावे कि मागे वळून बघावे? मी त्रागा कारवी कि पक्षाप्रमाणे मी स्थलांतरित व्हावे. कि पिवळया पंखाच्या पक्ष्यांप्रमाणे झाडावर बसून गप्प निष्पर्ण पंगतीत जळालेल्या वृक्षावर निर्विकार बसून राहावे? ऑफिस म्हणजे दुसरे घर, सेकंड होम असते. लड झगड आगे बढ, करत मी या ऑफिस मध्ये तीस वर्ष काढली. खरेतर गणित का चुकवे? हातचा घेतल्याने कि पाढे येत नव्हते म्हणून? कि अंदाजाने लिहिलेले उत्तर चुकीचे असावे? कौन बनेगा करोडपती सारखे झाले होते. अनेक ऑप्शन समोर होते, मात्र थोड्याफार फरकाचे व गोंधळात घालणारे होते. त्यावेळी त्या तीस सेकंदाच्याच वेळात त्यातील एक पर्याय निवडून मी या नोकरीत आले व मग पोटासाठी धावत राहिले, घोड्याने त्या झापडांपलीकडे बघितले कि चाबूक पाठीवर पडतो. जगाच्या पाठीवर कुठे हि जा ती झापड आपोआप गळून पडत नाही. मळलेल्या वाटेवरून  वेगळया वाटेवर जायचा पायंडा पडायची भीतीच वाटते. म्हणूनच मग चेतन भगत सारखा लेखक बँकेत क्लार्क असतो. अमरापूरकर सारखा डॉक्टर नातं होतो. व.पु,काळे पेशाने आर्किटेक्त्त होते व लेखक म्हणून गाजले. हे प्राक्तन असावे. त्यांचे व रसिकांचेही! त्यांची दोन्ही घरटी कशी ठेप ठेवली जायची याचा अंदाज आहेच. मात्र त्या दोन रेषांवर पावले ठेवून कलाकाराची फरफट होतेच. कधी कलाकार जिंकतो. कधी कर्मचारी जिंकतो. कधी दोघेही हरतात. दरमहा निश्चित मिळणाऱ्या पगाराच्या साखळदंडात कला गुदरते. चालत चालत मी खूप दूर निघून

आले आहे. रास्ता चुकले आहे. आता तीस वर्षे मान मोडीची सवय लागली, चाकोरी सोडवत नाही. आणि हिम्मत करून उभे राहवत नाहीये. जीवनाची लढाई, अस्तित्वाची लढाई संपली आहे. पोटाची धडपड संपताच नसते, वय उतरले तरीही लढाई चालूच राहते.

संपली आहे हिम्मत पण मोडला नाही कणा  
आशीर्वाद देऊन, अजून लढ म्हणा  
नव्या वाटेवर चाल कलाकार हो म्हणा  
दोन्ही घरटी विसरून लोकप्रिय बना



# ७४ पर्याय

"कौन बनेगा करोडपती" अगदी वरच्या पडावाला पोहचल्यावर ख़ुशी. एखादा पर्याय चुकीचा निवडला कि माणूस धडाधड खाली कोसळतो. त्यावेळी त्याला वाईट वाटते त्याला दोष दिला जातो. मात्र ते त्याचे नशीब असते. आपल्याला सुद्धा कधी वाटते आपण वेगळा पर्याय वेगळी वाट निवडायला हवी होती. टर्निग पॉईंट पाशी निर्णय चुकतो कि हा निर्णय विधिलिखित असतो? जे मिळते त्याला पर्याय नसतो. त्याचा स्वीकार करूनच घ्यावा लागतो. ते इंरिव्हरसिबल असते. आयुष्याच्या उतरणीच्या वेळी जर-तर विचार छळू लागतात. पण रिवाइंड जात नाही.

जीवनाच्या संध्याकाळी मी तृप्त आहे. मला कशाचाच पश्चाताप नाही. मी खुश आहे" हि वाक्ये निवृत्तीच्या निरोप समारंभाला छान शोभतात. आयुष्य कसेतरी वेगळे घडायला हवे होते. असे नेहमी वाटते.

"तुम मिल जाते, तो हो जाती पुरी अपनी रामकहाणी"

हार घर ताजमह बन जाता

गंगाजल आँखोंक पानी||

पण असे होत नसते, म्हणून ताजमहाल एकाच आहे व गंगाजल हि दूषित आहे.

तू नहीं तेरा गं 'तेरी जुस्तजू भी नहीं

गुजर राही है कुछ जिंदगी ऐसे जैसे इसे किसी सहारे कि आरजू हि नहीं |

विना तक्रार मनातून चडफडत दुसऱ्याचा हेवा करत जगणे मानवी स्वभाव आहे. करियर चांगले नसणे, जीवांसाठीची निवड चुकणे, मित्राची निवड चुकणे. आपल्याला सर्व सेकंड बेस्ट, सेकंड मिळणे अशा प्रकारची जखम मनात राहते. ज्यांना स्वप्नेच नसतात ज्यांच्यात काही खास गन नसतात, त्यांच्या मनात "जर असे झाले असते तर?" हा सल नसतो. बाकी हि खंड बऱ्याच जणांच्या मनात असते. नाईलाजाने का होईना जीवनात आलेल्या व्यक्तींना स्वीकारावे. स्वतःच्या जीवनातील सर्व निर्णयांना व सुख दुःखांना आपण स्वतः जबादार असतो. इतर कुणीही असते आणि इतरांना दोष देऊनही काही फरक पडत नाही. नूरजहाँ राणी, अकबरा बरोबर

नाईलाजानेच आली. आपण तिने ते स्वीकारले. प्रसिद्ध चित्रकार शल्य विशारद, कलाकार सुद्धा जी करियर मिळते ती करतात. स्वीकाराची भावना ठेवली कि "ऑल इज वेल" होते.  जे बदलू शकत नाही त्या बाबत दुःख करून काय उपयोग पर्याय आहेच कुठे?



## ७५बोलावरी डी कि कोलावरी डी

खरेतर लिहणे हा बिन कामाचा छंद ! काय हि मुलगी कोलावरी डी बिनकामाच्या छंदातील निरर्थक शब्दांच्या भेळेने त्याला यश मिळवते. पोट न भरता येणार छंद पाळून काळ्या वर पांढरे करून नक्की मी काय मिळवले? हा प्रश्न मला नेहमी पडतो. कोलावरी डी वाचल्यावर तर .... किती हि भारी सुचते कवितांच्या ओळी,

पोट भरायला लागते अन्नाची थाळी

अशी एक वेदना मला चालते. शुद्ध वेदनांची पायवाट चालावीच लागली तेव्हा नवोदित पासून थोडी ओळखीची एवढी ओळख मिळाली.

अनामवीरा जिथे जाहला तुझ्या करून अंत

स्तंभ तुझा न कुणी बांधला पेटली ना वात

अशा शब्दात नवोदितांची व्यथा, श्रद्धांजली वाहूनच व्यक्त होते. अशा ना नवोदितांच्या स्ट्रगलर्सला लुबाडणाऱ्या जगात एक नवोदित मात्र गाजत आहे. कोलावरी डी म्हटल्यावर कॉडलिव्हर ऑइल आठवते. एक व्हाईट स्किनची (गोरी गोमटी)मुलगी हि कशा प्रकारे त्रास देते हे एक तामिळ माणूस मिश्र भाषेत सांगतो. आणि भाव खाऊन जातो. हो अगदी जगभरातील रेकॉर्ड मोडतो असे गाणे असे का गाजावे?केवळ योग योग्य? एखाद्या गाण्याचे नशीब दुसरे काय! सोप्पे शब्द, निरर्थक विस्कळीत वाक्ये त्यात आहेत. शब्दांना नसते दुःख शब्दात सुख हि नसते.

ते वहातात जे ओझे ते तुमचे आमचे असते! कोलावरी डी मध्ये अशाच प्रकारचे शब्दांचे ओझे अभिनेता धनुष याने आपल्या पहिल्या गाजलेल्या कोलावरी डी या गाजलेल्या गीताला दिले आहे. यु ट्यूबचा सुवर्ण पुरस्कार मिळवणारे हे गाणे म्हणजे शब्दांचे एक कोलाज आहे. "र" ला "ट" "ट "ला "प"

कविता होईल आपोआप

अशीही कोलावरी डी मी ऐकल्यावर मला पटले, सक्सेस इज अ चान्स. 'तेरी एक हसीके बदल मेरी ये जमीन लेले. म्हणणाऱ्या गुलजारांपेक्षा हि छान असे यात खरेतर काही नाही. जगभरात पहिल्याच गाण्याला पहिल्याच व्हिडिओला इतके हे यश

मिळणे नशीबच! थ्री चित्रपटातील हे गाणे म्हणजे भाजीचे मिश्र असे कडबोळे आहे. तामिळ, हिंदी,व इंग्रजी अशा तीन भाषांमध्ये ठुमके व तालाचा ठेका व बालकवितेची चाल, चला ती नीट कळवा त्या नंतर त्या शब्दांचे थालीपीठ व्हिडीओ वर थापा, आशय असो नसो, ते गीत गाजेल. असा एकही कट्टा नाही एकही नियतकालिक नाही ज्यात या गाण्या बद्दल लिहिले नाही. काय हि मुलगी ?(कोलावरी डी )

काय हे नशीब! काय हे शब्द, काय करू ईर्षा होते कोलावरी डी



# ७६राजघराणे

राजे रजवाडे, राजकन्या, राजपुत्र, राजवाडा अशा शब्दांचे प्रत्येक सामान्य माणसाला आकर्षण असते. त्या राजघराण्याशी संबंधितांना त्या राजघराण्याच्या संबंधांचा संदर्भाचा सुद्धा अभिमान वाटतो. लाह्या बालकाला आई जेव्हा लहानपणी "एक होता राजा, एक होती राणी" राजमहलाला हजार दरवाजे होते. वगैरे वगैरे सांगते तेव्हा तीही खूप होते. ती अशी गोष्ट सांगते तेव्हा ते बालक किंवा बालिका डोळे विस्फारून बघते. राजघराण्याचे आकर्षण प्रत्येकाच्याच मनात तेव्हापासूनच सुरु होते. संशोधनात तर असे सिद्ध होईल कि साधारण 50% घरी मुलाचे नाव राजा असते किंवा मुलीचे नाव राणी असते. खरेतर आपल्या मुलाचे नशीब व आयुष्य राजासारखे असावे त्याचे नशीब उज्वल व्हावे हि आशा, अपेक्षा त्या राजघराण्याशी संबंधित नावामुळेच व्यक्त होते. उदा. राजू का था एक ख्वाब, राजू राजा राजा साब! श्रीमंत, आदरणीय अशी स्वातंत्र्यपूर्व काळातील अनेक राजघराणी सरकारद्वारे दिले जाणारे तनखे, भत्ते बंद केल्यावर त्या निर्णयामुळे आर्थिकदृष्ट्या प्रभावित झाली. अनेक एकरांमध्ये परसरलेल्या वाड्या, बागा, बग्ग्या, करोडोंचे जयदाद, हिरेमाणके असे, संपत्तीचा खजिना राजघराण्यामध्ये होता व आहे. काही ठिकाणी उदा. जम्मू, जयपूर आशा ठिकाणचे राजवाडे हे पर्यटकांसाठी हॉटेल, निवास स्थाने अशा रूपात पुनरुज्जीवित झाले. जनता जनार्दनाच्या मनामध्ये या राजघराण्या बद्दल आदराची भावना होती व आहे.

राजघराण्या भोवती असलेले एक आकर्षक वलय व आदर यामुळे राजघराणी समाजमनात पाय रोवून आहेत. अनेक रजवाडे, किल्ले, यांचे वारसदार त्या जुन्या वैभवशाली इतिहासाचा वारसा जपतात. आधुनिक काळात इंटरनेट मोबाईल च्या जमान्यात सुद्धा डिस्ने कॅसल, सिंहगड, ताजमहाल, शिवनेरी अशा ऐतिहासिक वास्तूंचे आकर्षण अजूनही मानवी मनात असलेले ते राजा संदर्भातले आकर्षण दाखवते. राजा किंवा राणी हे त्यांच्या स्वतः च्या आयुष्याचे प्रमुख नायक असतात. लोकनाच्यता

धानाचे आकारशन असतात. वैभव,इतिहासम्म आर्थिक सुबत्ता, यामुळे स्वप्नाळू वयामध्ये प्रत्येक तरुणी सिंड्रेला बनून राजकुमाराची प्रतीक्षा करते. तर राजकुमार हत्तीच्या सोंडेत माळ घालून राजकुमार शोध सांगितल्यास हत्ती आपल्या गळयात माळ घालून राजा म्हणून निवडेल असे समजतो. राजघराणे मानवी मनात असे राज्य करीत असतात व सन्माननीय असतात.



## ७७धक धक गर्ल

अनेक हृदयांना धकधक करायला लावणारी, तरुणाची धकधक वाढवणारी वृद्धांना फिदा करायला भाग पडणारी माधुरी एका दूरदर्शन मालिकेच्या परीक्षकाच्या कामासाठी भारतात परतली आणि जाहिरातीमध्ये तिची छबी झळकू लागली. एक तप तरुणाच्या हृदयावर राज्य करून माधुरी वावरली. मिलियन डॉलर स्माईल, दुसरी मधुबाला, असे 'किताब तिने मिळवले, मिस वर्ल्ड ऐश्वर्या रॉय बरोबर ती देवदास मध्ये अगदी बरोबरीने ती खुलली. 1987 पासून चित्रपट तिने पाय रोवले होते. ते तेजाब चित्रपटापासून ! एक डॉ तीन चार पाच चे हे तिचे गाणे व नृत्य जबरदस्त गाजले. मध्यंतरी लोकप्रियता चढू लागली व यथाकाल कमी झाली. मात्र 1997 मध्ये "दिल तो पागल है" ने तिला पुन्हा यश मिळवून दिले. व माधुरी संपली आहे, लिहणार्यांना उत्तर दिले. योग्यवेळी श्रीराम नेने नावाच्या अनिवासी भारतीयासोबत लग्न करून ती परदेशी गेली.

अमेरिकेतील डेन्व्हर येथे ती स्थायिक झाली. दोन मुलांची आई झाल्यावरही तिची भारतभेट, तिचे ट्विटर वरील वक्तव्य तिची फोटो तिच्या मुलाखती या बद्दल खूप उत्सुकता समाजात होती.

पुकार, लज्जा, दिल, बेटा या चित्रपटानंतर  धकधक गर्ल म्हणून गाजलेली माधुरी उत्तम नृत्यांगना सुद्धा आहे. काही काळ मो.हुसेन या चित्रकाराने तिची काढलेली चित्र यामुळे तिला पुन्हा प्रसिद्धी मिळाली. हुसेन यांनी काढलेल्या "गजगामिनीतील " तिची नृत्ये प्रेक्षणीय होती. मात्र खूप गवगवा होऊनही तो चित्रपट चालला नाही.

काही नटांसोबत काम करतानाही ती वेगळ्या कारणाने चर्चेत अली तरी तिच्या चेहऱ्यावर ते हसू व डोळयात चमक कायम राहिली. मराठीपण सुद्धा तिने जपले. तिच्या नृत्याच्या कलेला केंद्रस्थानी ठेऊन "आजा नचले" हा चित्रपट बनवला गेला. पण "आजा न चले" म्हणून तोही चित्रपट आपटला.

माधुरीची चित्रपटसृष्टीतील दुसरी इनिंग सुरु झाली आहे. बघू या ती फर्स्ट क्लास होते कि सेकंड क्लास! अर्थात माधुरी आहे ती तिची इनिंग स्पेशन इनिंग असणार हे निश्चितच ठरले आहे.श्री राम नेने बरोबर विवाह केल्याने तिची नौका तरणार

रामनाम नौका

श्री रामनाम नौका भावसागरी तराया
सुटेल अफाट वारे मन तारू त्यात बिथरे
या वादळातुनी नेईल रामराया ||धृ||

भ्रम भोवऱ्यात अडली, नौका परी न बुडाली.
धरुनी सुकाणू हाती, बसलेत रामराया ||
मंद लोभ लोभ सुसरी, किती डंख, किती विषारी
ते दुःख शांतावया, मांत्रिक रामराया ||



# ७८कालची आपली माणसे

कलके अपने ना जाणे क्यू हो गये आज पराये? खरेच काय कारण असते?

डुबा सुरज फिरसे निकले

राहता नही है अंधेरा

मेरा सुरज ऐसे डुबा

देखा ना मैने सवेरा - अशा निराश मनस्थितीतील "अमानुष" या चितपटातील हे गाणे आहे.

कलके अपने ना जाणे क्यू हो गये आज पराये?

दोष नही है तूफानोका

माझी हि के डुबे

दिवानापनकर बन कर रह गये

मन के मन सुबे

ताशोनक घर सामने आये

बनते हि गीर जाये

रेत का सागर प्यार का सपना

प्यासा हि तडपाये

प्यार ने क्या क्या रंग भरे थे

लिखी थी दो ताकदीरे

आई जो आंधी बनकर मीट गयी

बादल कि तस्वीर , प्यार का रंग है कैसा रंग डाग बन जाये.

माणसे अशी बदलतात, नाती बदलतात'

काळ आपली असलेली माणसे आज साथ सोडून जातात.

माणूस ओळखण्यात चूक होते ? कि मनुष्य स्वभाव ओळखण्यात होते? ब्रेकअप मैत्री तुटणे अदलाबद्ल!

आपली माणसे कायम आपलीच राहावी म्हणून आपण नेहमीच प्रयत्न करतो पण त्यात यश येतेच असे नही. आपली माणसे कायम आपली राहणे अशक्य नसते पण अवघड असते.

आपली माणसे म्हणजे तरी नक्की काय? माणसांवर काय आपण हक्क ओनरशिपचे राईट टाकू शकतो का? त्यामुळे बादल हे स्वीकारावेच लागतात व दुरून बघून म्हणायचे हि कालची आपली माणसे"

प्रेमाच्या रंगाचे डाग धुवून पुसून खरडून सुद्धा जात नाहीत.



# ७९बुलडोझर

एका क्षणात बुलडोझर फिरवून त्यानीच तर माझा या संस्थेशी असलेला संबंध संपवला. नटे क्षणाक्षणाने, कणाकणाने सुद्धा तुटते. पण माझा या संस्थेशी जुना संबंध कधीच संपला आहे. ज्या दिवशी मला बोगस चार्टशीट दिले त्याच दिवशी तो बुलडोझर नीतीवर फिरला. त्या संपलेल्या नात्याचे कलेवर उचलून मी 8 महिने काढले. "इथून बाहेर पडल्यावर तुझा या संस्थेशी काहीही संबंध नही. मी स्वतःलाच बजावले." पूर्वी पासूनच या संस्थेत तुझे कुणीही नाही. मन म्हणाले तू तुझ्या एखाद्या चांगल्या कार्यक्रमासाठी या लोकांना बोलावले तर ते काहीतरी विचित्र बोलतील. त्या शाखेत काम कशाला करायचे? कर्ज कशाला मंजूर करायचे? काम कमी करावे पण व्यवस्थित करावे. असे म्हणणारे दामोजीपंत या बँकेत आहेत. ते यशाची भागीदारी मागायला आले आहेत. मदतीला नाही. ते खंडणी मागणारे व्यवस्थापक हायेत. काम करू नका सांगणारे आहेत. या संस्थेच्या आवारात दोन इंचाच्या जागेत एक वेल वाढली होती. इतरांच्या हेव्या दाव्याकडे दुर्लक्ष करून! इन ऍक्टिव्हिटी म्हणजेच शिस्त असे म्हणणारे व समजणारे आले त्यांनी मोठा बुलडोझर आणला आणि----

पारिजातकाच्या फुलाचा सदा शिंपणाऱ्या झाडाला तोडून टाकले. याची खंत कुणालाच नव्हती.

शोर मी खामोशी है" म्हणत तो कोलाहल सहन करणे सोप्पे नव्हते. काही महिने ते सोसले. एका प्रकारच्या आंदोलनात झाड तोडताना ते तोडले जाऊ नये म्हणून कार्यकर्ते त्या झाडाला घट्ट मोठी मारून ते झाड तोडण्यापासून त्या लाकूडतोड्याला परावृत्त करतात असे कोणीच आले नाही. रोज वाटायचे काहीतरी चांगले घडेल. पण ते घडलेच नाही.

किसी ख़ुशी का मेरे दिल को इंतजार नही. घरादारावर नगर फिरवला हि म्हण जशी दुःखदायक असते तेवढी हि वेल तोंडाने कुणालाही दुःखदायक नव्हते. त्यांच्या जमाखर्चाच्या हिशोबात एका वेलीच्या नसण्याने काहीच फरक पडला नाही.

फरक मलाच पडला आहे. बुलडोझर माझ्याच नशिबी का यावा?

# ८०थंडीची धुंदी

थंडीची धुंदी आपल्याला आळशी बनवते. काहीजणांना हिवाळा आवडतो पण हिवाळ्याचे नाईलाजानेच नेमेचि येतो हिवाळा असे म्हणत आपण स्वागत करतो. ऋतुचक्र हे चालूच राहते. ऋतू बदलत राहणार व चार महिन्यांनी नवा ऋतू व 8 महिन्यांनी हिवाळा परत येणार हे निश्चित असते. बादल माणसाला हवाच असतो. नाव गालात असते, गरम कपडे टोचतात, कंटाळवाणे वाटते  आलास येतो. आला हिवाळा तब्बेत  सांभाळा " असे वृद्ध स्वतःला समजावतात. थंडीला गुलाबी थंडी, मघाची थंडी, बोचरी थंडी, हळवी थंडी नवरंगी थंडी अशी कितीही नाव ठेवली तरीही डिसेंबर महिम्यात थंडी हजेरी लागतेच. ख्रिसमस (25 डिसेंबर ) ला बर्फाच्या राशी तुडवत सांताक्लाज येतो. त्याच्या त्या बर्फारवर चालणाऱ्या घोडा गाडीतून नवीन वर्ष घेऊन येतो. नोव्हेंबरच्या शेवटच्या थंडी क्षितिजावर दिसते व डिसेंबर ते फेब्रुवारी ती स्थिरावते. मार्च मध्ये ती काढता पाय घेते.

थंदीच्या ऋतूला हिव भरते म्हणून हिवाळा म्हटले जाते. हिवाळयात पॉट रिकामे वाटते. कारण थंडीने भूक लागते. त्यामुळेच दिवाळी, ख्रिसमस नवं वर्षाची पार्टी , संक्रांत भोगी असे सण हिवाळ्यातच येत असावे. निसर्गाने आनंद व्यक्त करण्यासाठी फळ फुलांची टोकारी आणलेली असते. ऋतूचे वळण आपण पुन्हा एका वळणावर आहोत हे सांगते. भाज्या, गाजर मटार मुळे संत्री पिवळी केळी रताळी, कंद, वांगी , हिरव्या भाज्या अशा विविध रंगांच्या या टोकारीतून हिवाळा एक बक्षीस आणतो जे आनंददायी या आरोग्यदायी असते. पहाटे, कोवळे सोनेरी ऊन सुखावते. उत्तरेकडील देशांमध्ये बर्फ पडते. दिवस छोटा होत जातो.

हिरव्या झाडांच्या शेंड्यांवर सकाळी व संध्याकाळी सूर्यनारायण सोने शिंपतात. पाचूच्या हिरव्या माहेरी, ऊन हळदीचे ओले"



असा सोनेरी प्रकाश पसरतो. थंडीची धुंदी माणसाला मदहोश बनवते. चुलाण्यावर चहा उकळू लागतो. रस्त्याच्या कडेला हुरडा भाजला जातो. रात्री शेकोटी केली जाते. गरम कपड्यांद्वारे शरीर उबदार केले जाते. जुन्या ठवणी काढून सहली काढून मनाला सुद्धा नाते संबंधी उब दिलीजाते. थंडीचे दिवस भराभर जातात. पटकन थंडीही संपेल आणि मग चाहूल लागेल उन्हाळयाची! ऋतू हे बदलणारच ! तो निसर्ग नियम आहे. असे जगाचे फिरे चक्र बाळा

पावसाळा हिवाळा नंतर उन्हाळा.

## ८१हा माणसांचा मॉल

मॉल मध्ये जशी वेगवेगळी असंबद्ध दुकाने एकत्र असतात, तशीच या जगात वेगवेगळी माणसे वावरतात. त्यांचे बाह्यरंग व अंतरंग, अर्थव्यवहार सर्वच वेगवेगळे असते. काही कलाकार रोज जळत असताना, निरो नावाचा कवी त्याचे वाद्य फिडल वाजवत होता. कलेचा आनंद असा असतो. वरवरचा आपल्या त्या भेटपत्राच्या, ग्रीटिंग्स काड्र्स वरच्या माहितीचाही पुढे असते ती व्यक्ती! त्या व्यक्तीचा बनतो तो समाज, या समाजाचे मन समष्टी/एकत्रित बनत तो हा समाज हा मॉल! सामान्यतः आपले मन तसे दुबळे असते, त्यामुळे आपल्याला इच्छा शक्तीच्या बळावर यश मिळणे अवघड जाते. मन हा खरं तर दुबळा साधा हक्क न गाजवणारा नोकर असतो. मात्र या मानाने जर आपल्या सर्व कार्यावर धिकारी गाजवायला सुरुवात केली तर तो एकदम अहंकारी मालक बनतो. आपला अहंकार शुद्ध असेल तर गोष्ट वेगळी पण जर "कसेही करून यश मिळवायचाच ठरवले तर हा अहंकार आपल्याला चुकीचा मार्ग दाखवतो. तास मॉल त्याचे सांघिक निर्णय चुकू शकतात.

मनातील अंधारी भाग हा माणसाला आपल्याशी करतो. खचवतो, तर मनाचा शुद्ध संकल्प त्याला यश देतो. "जब जुनून पागलपन कि हद तक बढ जाये तभी इन्सान कुछ कर सकता है. " समाजाने त्याचा हा अधिकार योग्य वापरलं तर तो योग्य तो दबाव सरकारी कामकाजावर पडू शकतो. जसे अण्णा हजारेंच्या आंदोलनात आपण पहिले तसे हे समाजमन विधायक कार्य करू शकते. बजेट प्रमाणे आवड व गरजे प्रमाणे या मॉल मध्ये वस्तू विकत मिळत नाहीत तर अनुभव  विकत मिळतो. कधी फुकट हि मिळतो. असेही हल्ली प्रत्येकच व्यक्तीचे सुद्धा मॉल मधील देखण्या आकर्षक, सजावटीने सजलेल्या एककात रूपांतर झाले आहे. नको त्या दुकानाला भेट द्यायची नाही तशीच या समाजात नको त्या माणसांना, नात्यानं टाळण्याची सुद्धा पद्धत अली आहे. जसे मॉल मध्ये आपण विंडो शॉपिंग करून खुश राहतो. तसे हि या माणसांच्या मॉल मध्ये माणसे वाचायला शिकले पाहिजे. प्रत्येक माणूस एक बघण्या वाचण्याची



गोष्ट असते. छोट्या छोट्या गोष्टींमध्ये आनंद मिळवणे अवघड नसते. पण सहज शक्य सुद्धा नसते. दुसऱ्याच्या सुखाची ईर्षा ठेवली तर आपण कायमच असमाधानी राहतो. (अर्थात हे कळायला एक ठराविक वय लागते.)

माणसांच्या मॉल यामध्ये एकदा गर्दीत संध्येत चक्कर मारून या! या मॉल मध्ये विंडो शॉपिंग करून माणसे बघा.

भरतीतील असे परदेशातील असो. मॉल यामधील वस्तू महाग होताहेत, व माणुसकी महाग होते आहे. आपुलकी माहित होते आहे. फक्त मॉलच चमकत आहेत.

# ८२गेले ते जाते

सुंदर माझे जाते ग फिरते बहुत
ओव्या गाऊ कौतुके तू रे ये बा विठ्ठला ||

जीव शिव दोन्ही खुंटे हो, प्रपंचाचे नेटें हो
लावुनिया पाची बोटे, तू रे ये बा विठ्ठला ||

सासू आणि सासरा, दीर हा तिसरा
ओव्या गाऊ भ्रतार, तू रे ये बा विठ्ठला ||

बारा सोळा गडनी अवतीभोवती, जमल्या कामिनी
ओव्या गाऊ बैसूनि, तू रे ये बा विठ्ठला ||

प्रपंच दळण दळिले पीठ हो भरिले
सासू पुढे ठेविले तू रे ये बा विठ्ठला ||

स्वत्वाची आधण ठेविले, पुण्य हो भारिले
पाप ते ओतून गेले तू रे ये बा विठ्ठला ||

जणींचे जाते गेल कीर्तन राहील
थोडासा लाभ होईल तू रे ये बा विठ्ठला ||



विठ्ठलाचे नाम स्मरण करीत जनाबाई दळण करीत असते, जात्यावर ओवी म्हणते. "हरिभजना वीण काळ घालवू नको रे." हे म्हणताना तो संदेश घेऊन जणी दळते. तो कालच असा असतो, केशरी भक्तीने दळण दळताना जात्यावर सुद्धा विठ्ठल नामाचा जप केला जातो.

माझे माहेर पंढरी आहे भेमदेच्या तीरी

कानडा राजा पंढरीचा, विठ्ठल समचरण तुझे धरिते, धाव घेई विठ्ठल, जीव विठ्ठल शिव विठ्ठल, सावल्या तनुचे मज लागले पिसे ग, विठ्ठल आवडी प्रेमभावो. सावल्या विठ्ठल तुझ्या दारी आले. पाहू दे मज विठ्ठलाचे मुख अशा अनेक भजनांबरोबर जनाबाईची जात्या वरच्या दालनाची ओवी सुद्धा भक्तीत चूर आहे.

आता जाती उरली नाही, जात्यांवरच्या ओव्या नाही.जनाबाई नाही, विठ्ठलाच्या नावाने विठू गाजर करणाऱ्या दिंड्या अजूनही आहेत. कधीतरी अन्नदाता सुखी हो म्हणून जेवताना वाटते. "गेले ते जाते"

मागे विठ्ठल नामाचा हो टाहो, ओवी म्हणत दळण दळण्याचे काम संपले. विठ्ठल मात्र हृदयी उरला. जे गेले ते जाते. जे उरते ते राहते. तिन्ही लोकी पुरून उरला विठ्ठल माझा.

# ८३माझे घर

घराला सुंदर रूप हवेच असे नाही पण श्रद्धा व संस्कारांचे अधिष्ठान हवेच हवे.
आचार विचार घराची आखणी आहे.
प्रेम हा घराचा पाया आहे
थोर मॅनर्स हि घराच्या भिंती आहेत
जिव्हाळा हा घराचा कळस आहे ||1||
माणुसकी हि घरातील तिजोरी आहे
गॉड शब्द हि घरातील धनदौलत आहे
शांतता हि घराची लक्ष्मी आहे
आत्मविश्वास हे देवस्थान आहे ||2||
दुजाभाव विसरणे हि घरातील समई आहे
पैसे हा घराचा पाहुणा आहे
गर्विष्ठपणा हा घराचा वैरी आहे
अहंकार हा घराचा सर्वनाश आहे ||3||
आतिथ्य हेच घरचे वैभव आहे
नम्रता हीच घराची शोभा आहे
व्यवस्था समाधान सुख आहे
सदाचार हा घराचा सुगंध आहे
चरित्र संपन्नताही घरची कीर्ती आहे
देवाचा वास अशाच घरात आहे (संग्रहित )

घर सजावट, इंटिरिअर डेकोरेशन, वास्तू सजावट, प्रकाश योजना, या सर्व गोष्टी घराला आकर्षक बनवतातच, मात्र घराला संस्कारांचा भक्कम पाया असेल तरच तो बंगला अथवा फ्लॅट घर बानू शकतो.

घर दगडांचे नसते
घर माणसांचे असते
घर भिंतींनी दिसते
पण मनानी बनते
बंगल्या मध्ये फ्लॅट मध्ये



संस्कार ठेवा मना मध्ये
शांती वसावी घरामध्ये.

कर्ज होईल असा खर्च करू नका. पापाची कमाई खाऊ नका. अपशब्द बोलू नका. उगीच चिंता होईल असे जीवन जगू नका. म्हणजे तुम्ही अभिमानाने म्हणू शकाल. हे "माझे घर"

# ८४शब्द प्रेरणा

शब्दांचे जीवनातील स्थान फारच श्रेष्ठ असते. शब्द जी प्रेरणा देतात त्या शब्दांच्या प्रेरणेचे स्थान एकाद्या वरदान प्रमाणे असते. त्या प्रेरणे कडे दुर्लक्ष केल्यास मोठे नुकसान होऊ शकते. शब्द कधी कधी उलथा पालथ सुद्धा करतात. शब्दांचे एक मोठे अजब शास्त्र असते. शब्द शास्त्राबद्दल खूपच नवलदायक माहिती मिळू शकते. एखादी व्यक्ती बोलताना नीट ऐका. तिचे शब्द, उच्चार, शब्दफेक, विचार, अपेक्षित अनपेक्षित परिणाम बघून शब्दांना शस्त्र का म्हणतात ते कळते. परिणामहीन शब्द सुद्धा कुरतडण्याचे, बोअर करण्याचे, कंटाळा देण्याचे काम करतातच! ते टाळण्यासाठीच प्रेरणा देतात. जेव्हा आपण गुरु प्रेरणा गुरु माऊलीच्या प्रेरणेचा प्रसाद अंतर्नाद प्रेरणा या विषयी बोलतो तेव्हा पण हि प्रेरणा शब्दांनी दिलेली असते. शब्द नवीन क्षितिजे खुली करतात. नव्या दिशा दाखवतात. एखाद्या कीर्तनकार, किमयागार नवीन वाट दाखवू शकतो.

अन्न, वस्त्र, निवारा, या इतकेच शब्द सुद्धा जगण्यासाठी आवश्यक असतात. दोन शब्द कुणाशीतरी बोलता यावे म्हणून आपण मंदिरात, बाजारात, मित्र मंडळीत, घरी, ऑफिस मध्ये कधी कधी कासावीस होतो. या शब्दांना आपण गृहीत धरतो. पण हेच शब्द बोलणे व ऐकणे सुद्धा जेव्हा दुर्लभ होते तेव्हा आपल्याला त्याची किंमत कळते.

चार्ल्स बेबेज नावाच्या शास्त्रज्ञांनी बेबल नावाच्या माशाची एक कल्पना केली आहे. या कल्पनेत बेबेल मासा जर कानात ठेवला तर समोरची व्यक्ती कोणत्याही भाषेत बोलली तरी त्याचा अर्थ उमगतो. महत्व शब्दाचे केवळ नसते, तर त्याच्या अर्थाचे हि असते. त्या अर्थाच्या आकलनाचे असते. म्हणजे शब्द प्रेरणा, शब्दाचा गर्भित अर्थ महत्वाचा असतो. शब्द प्रेरणेत बिनमंत्र, आरती, स्तोत्रे यांचाही समावेश असू शकतो. काही शब्द अढळ ध्रुव ताऱ्या प्रमाणे मनात घालत प्रेरणा देतात. काही जखमी करून देतात. काही आशा लावून देतात. काही विरंगुळा ! शब्दा वाचून सर्व केवळ अशक्यच ! मी शब्दांच्या घालुनी बसतो अमाप राशी

जखमी होतो धावत जातो शब्दांपाशी
शब्दच झाले मला आता या जगण्याचे
जनावराने काबीज केला हा दरवेशी.



## ८५नाटक म्हणजे कंदी पेढा

लोकसत्ता मधील नाटक वेडे लंडन हा प्रशांत सावंतांचा लेख वाचला. नाटकांचे रसिक हे अधिक चोखंदळ असतात. आमची आई म्हणत असे, सिनेमा म्हणजे चुरमुऱ्याची भेळ, मात्र नाटक म्हणजे कंदी पेढा! म्हणजे सिनेमा मध्ये सर्व विषय वेगवेगळ्या चवीचे असतात. नाटकात एकाच विषय हाताळलेला असतो.

भेळ स्वस्त असते, कंदी पेढा महाग असतो. (नाटकाचे तिकीट सुद्धा महाग असते) नाटक बघण्याचा शौक महागडा असतो. उच्च अभिरुची असलेल्या व्यक्तींनाच नाटक बघण्यात आनंद कळतो.

साधारण 1974 च्या दरम्यान पुण्याला बालगंधर्व नाट्यमंदिरात नाटके बघायला जायचो ती आठवण अजूनही मनावर कोरली गेली आहे. प्युअर सिल्कच्या, नारायणपेठ काठपदरी साडी घालून ललना नाटक बघायला येत. "कोपऱ्यावर राजहंस" नावाचे हॉटेल होते. तिथे गजरेवाला उभा असे. प्रत्येक स्त्री गजरा माळून येई

नाटक हाऊस फुल असे, आधी तिकीट काढावे लागे. आत शिरताच बालगंधर्वांचे तैलचित्र समोर उभे राहून, रसिक अंतर्मुख होऊन बंद करीत असत. नाटक उच्च अभिरुचीची पूर्ण असत. व नाटक बघितल्याचा आनंद दीर्घकाळ मनात रेंगाळत राही.

नाटक म्हणजे कंदी पेढा

# ८६सण साखळी

प्रति,

प्रिय दादास,

स.न.वि.वि.

माघी गणपती उत्सवाच्या शुभेच्छा. तुला मी राखी पौर्णिमेला बोलावले होते. पण जमत नाही असे कारण सांगून तू येण्याचे टाळले. "हल्लीच्या धावपळीच्या बिझी शेड्युल मध्ये, आशा सणासाठी वेळ घालवणे मूर्खपणाचे आहे" असे तू म्हणाला होतास. अरे भारतात वर्षभर सण साखळी असते.

प्रत्येक सणासाठी तुला दुकान बंद ठेवावे लागते. त्यामुळे तुझे पैशाचे नुकसान होत. असे कारण सांगून तू येण्याचे टाळले होतेस. भारतात वर्षातून 100 सण असतात. सारखेच दुकान बंद करून खायचे काय? अशी चिडचिड सुद्धा केली होतीस. त्यावरून तुला हे समज देणारे पत्र लिहावे असे मी अनेकदा ठरवले होते. मात्र आज वाईटपणा पदरी घेऊन मी तुला सणांचे महत्व सांगणार आहे. भाऊ बहिणीच्या पवित्र नात्यासाठी अनेक सण आहेत. मात्र संस्कृती संवर्धन साठी असते. भाऊराया वर्षभर भेटू नकोस. मात्र बीजेला  आल्याशिवाय राहू नकोस. भाऊबीजे बद्दल अशी एक ओवी प्रसिद्ध आहे. प्रत्येक नात्यासाठी सणांमध्ये खास जागा आहे. पती पत्नी साठी पाडावा. आई मुलगा साठी कोजागिरी पौर्णिमा, वडील मूळ यांच्या साठी धनत्रयोदशी प्रसिद्ध आहे.

सणांच्या उत्सवी वातावरणामुळे, जीवनात या सणातून हिंदू धर्माचे संस्कार होतात. जे पुढच्या पिढी कडे पोहोचवले जातात. हल्ली नवीन वर्ष इंग्रजी कॅलेंडर प्रमाणे जानेवारी मध्ये सुरु होते व तुम्ही आधुनिक लोक पार्टी करून सहली काढून नवीन वर्षाची सुरुवात करता. आपण खरंतर चैत्री पाडाव्या पासून मराठी महिन्याचे पंचांग वर्ष पाळायला हवे. जानेवारी पासून वर्षभराचे सण मराठी महिन्या नुसार कसे साजरे करावया बद्दल एक लोकगीत आहे. त्यानुसार तू  वर्षभर हे महत्वाचे सण साजरे



कर. पाडावा. राखी दिवाळी, नवरात्र दसरा, व संक्रांति साजरी करीत जा. धर्म संस्कारांची व मानसिक प्रगती साठी ते आवश्यक आहे. सर्वानी एकत्र जमावे, विचारांची देवाणघेवाण करावी. निसर्गाचे बदलते रूप बघावे. हा सणांचा हेतू आहे. सण साखळीला विसरू नको.

तुझी अक्का

# ८७विश्व मोहिनी

विश्व रूप हे एक मोहिनी पडणारे मोहक चित्रच असते. अशी कल्पना करा, असे म्हणतात परमेश्वर एक लहरी चित्रकार आहे. त्याच्या कडे एक मोठी रंगपेटी आहे. त्या रंग पेटीतील रंग मधून एक वेगळाच सर्वाना आवडेल असा रंग तयार करायची त्याची इच्छा आहे. म्हणून तो वेगवेगळे रंग मिसळून नवनवीन रंग करतो. मात्र त्याच्या संपूर्णपणे पसंतीला उतरेल असा रंग तो अजूनपर्यंत बनवू शकला नाही.

आकाशाच्या पुढे वृश्चिक ग्रहमालेच्याही वर परमेश्वराची चित्रशाळा आहे. तिथे तो चित्रे काढतो. रंगवतो, वस्तू बनवतो, रंगवतो. मात्र त्याच्या पसंतीला न उतरणारी चित्रे व खेळणी तो पृथीवर सोडून देतो. म्हणजे तो अवकाशात सोडतो. ती चित्रे वाऱ्याने उडून पृथ्वीवर येतात. जिथे बसून देव हि चित्रे घडवतो. दूरचे ते ठिकाण तसे अज्ञातच आहे. उगीच काल्पनिक भावना बाळगावी, श्रद्धा ठेवावी, तसे काहीसे अज्ञात असते. इतके अज्ञात कि त्याच्या अस्तित्वाबद्दल शंका यावी. नजरेला न दिसे न हि दृष्टीला जाणवणारे रंग. चांगल्या ग्राफिटीत,शाळे बाजूचा भिंतीवर मंदिराच्या आसपास नुकत्याच लिहायला शिकलेल्या मुलांच्या घराच्या भिंतीवर हि देवचित्रे असतात. स्वतः रंगवलेल्या देवाच्या पहिल्या चित्राने आदमने सफरचंद खाऊन जग बदलले.

या निसर्ग चित्रकाराचे चित्र बघायला गर्दीपासून दूर जाऊन बघा. एखाद्य खेड्यातल्या नदीवर भेट दिली कि बघा. नारळीच्या झावळया, केळीची पाने, कर्दळीची फुले, भाताची शेती. तेरड्याची रंग, जणू मखमली भरतकाम. सोंडेने पाणी उडवणारा हत्ती, पाण्यात डुबणाऱ्या म्हशी. ओल्या वस्त्राने कपडे धुणाऱ्या सुंदऱ्या, ओले केस ओली वस्त्रे. पाने फुले, अनेक रंगाची माती. पाणघोडे, गाढवे, पक्षी, तुळशी वृंदावन, झोपड्या. शेते, घोडे, जलाशय, त्यावर तरंगणारी एखादी नाव, झाडावरची घरटी. पान कमळे, मंदिराची गोपुरे, त्यावरील नक्षी सभामंडप, कीर्तनकार भक्त त्याची वीणा, त्याची पोथी, त्याची पगडी, आवारातील सतरंजी, रंगीत झुली. घालतलेल्या बैलगाड्या, देवालयातील शिल्पे मूर्ती. त्या निर्जीव मूर्तीच्या चेहऱ्यावरचे



भाव, देव शिल्पकाराच्या बोटातून घडते, वठवतो. अंगरखा, गळयातील माळ, फळांचे रंग, कलिंगडाची रंगसंग रंगाची उधळण, मांडणी असते. या विश्व मोहिनीत मुंगी पासून हत्ती डायनोसॉर पर्यंत सर्व काही असते. टपोरे काळे डोळे, पातळ ओठ, गजरे माळलेले केस, मुकुट, सर्व नखरे जामानिमा देवाने रचलेला रंगवलेला असतो. कल्पने पलीकडचे व अपेक्षित असलेले व नसलेले सर्वच या विश्वाच्या पसाऱ्यात आहे. पसारा असूनही सुंदर आहे. झाडावरचे पक्षी बघा, झाडावरचे एखादे फळ वरून रंगीत दिसते पण पक्षी ते आतून अलगद खातो. त्या पक्ष्याची चोच, तो त्याची पिल्लं जणू कापसाचे रंगीत चेंडूचा वाटतात. देव अजब कलाकार असतो. नानाविध कुंचल्याने रंगलेली त्याने जी चित्रकृती केली ती पूर्णपणे त्याचीच मर्जी असते. एकाच रंगाच्या विविध छटा, पांढऱ्या -काळया रंगाची तोलून मापून केलेली पेरणी, किंवा फक्त बाह्यरेखा, प्रकाशरेखा, देवाने रंगसामर्थ आजमावणे! टेकड्यामध्ये झाडांमध्ये दडलेल्या झऱ्यात तो दूध मलाईची उधळण करतो. कधी नदीला तो दूधगंगा बनवतो कधी शेवाळयाची हिरवी नदी करतो.

लहान कोवळे बालक ते चांदीच्या मुठीची काठी घेणार. आजोबा दोन्ही चित्रे तोच रचतो, तो त्याच्याच कलेचा प्रवास असतो.

पृथ्वी वर्हची पहाट, रोजची सकाळ, हि देवाची जणू रंगशाळा असते. हजार लोलकांच्या झुबरातून सूर्याचे किरण तो पसररवतो, हसतो व ते चित्र पुसून सुद्धा टाकतो.

ये कौन चित्रकार है?

एखाद्या गृहिणीच्या घरी देखील देव चित्र काढत बसतो. शेवया, कुरडया, इडल्या, चपात्या, करंज्या, पत्रावळी, केळीची पाने, माठ पंखे, तिच्या रांगोळीकडे बघा, तो गालिचा कासव चंद्र सूर्य, अठरा चौकी वृंदावन ती कलाच असते. वारली,चित्रकला, हातमागावर विणल्या जाणाऱ्या वस्तूंवरची चित्रे, देवच जर ती कल्पना या कलाकाराच्या डोक्यात घालतो. गृहिणीचे अंगण, पिंपळ पार कट्टा, सभागृह, कमानी, नर्तिका, तिची घुंगुर माळ, ये किसी कवी कि कल्पना का चमत्कार है!

नाव झाले एक दोन चित्र काढली कि मानव अहंकार करतो. मी मोठा चित्रकार झालो असे समजतो. बक्षिसांनी कपाट भरतो. स्वतःला ग्रेट समजतो. तो देव मात्र निरपेक्ष पाने काम करीतच राहतो.

देवाच्या हातात रंग तबक असते त्यात तो ट्यूबमधून रंग ओततो. चांगले एकजीव करतो.व कुंचल्याने रेखाटने सुरु करतो. कॅनव्हॉस एझोल वर (चित्र सोपानावर) स्टॅन्ड लावलेला असतो. मनासारखे जमले नाही, पृथ्वीवर सोडून देत वर्षानुवर्षे देवाचा हा खेळ चालू आहे म्हणून तर परफेक्ट पर्सन नेव्हर एक्सिस्टस

आयडियल सिच्युएशन नेव्हर एक्सिस्टस

देव हिमालयात जातो. बर्फाच्छादित हिमशिखरे त्या वरची बर्फाची चादर, त्याच कोरा चित्रफलक असतो तो सुरुची झाडे, सूर्यकिरणे, पक्षी रेखाटतो. काय वाटेल ते करून चित्र सुरु करतो. माणसा सारखे चमकणारे शिखर एखादा जलाशय, देवदार, सुरुची झाडे, देव रंगवतो. बर्फातून जाणारी रेनडिअर ची गाडी, संताक्लोज, हि देवाचीच रूपे आहेत.

"जे पिंडी ते ब्रह्मांडी" त्यामुळे देवाच्या चित्रकलेत सर्वच आले. विविधता नावीन्य, विश्व मोहिनीतील अगणित रूपे, असतात. नदीला माता म्हणतात. त्या मातेचे उपकार स्मरून देवाने नदीचे चित्र विशेष मन लावून रंग भरून बनवलेले असते. पोर्ट्रेट तस्वीर बनवलेली असते. मावळतीचे रंग तर किती विविध असतात. जणू चित्रकाराची रंगपेटी कलंडलीय.

देवाचे मनात पुराणकाळापासून रंगकाला सजतेय. जुन्याकाळाचे फोटो आठवा. निळा पडदा, फुलदाणी, पुढे डोळयात कृतार्थ भाव घेऊन उभे प्रेमळ कुटुंब. सावल्या रंगला जग तुच्छ लेखात, म्हणून त्या देवाने कृष्ण सखा या रूपात कला रंग धारण केला. आठवणींची चित्रे स्वप्नाची चित्रे, तर पुराणकालीन दरबाराची आठवण देतील अशी असतात. उंच समयानी रत्ना राशींनी प्रकाशित ते दरबार देवाने जणू एक स्वप्नाचं असते. देवाला विश्वाची विश्वमोहिनी पडते व तो विश्व बनवतो. कि विश्वमोहिनी हेच कळत नाहीसे होते?



## ८८ जड झाले ओझे.

बेडी, लोढणे, अडथळा, अडगळ, ओझे, संसार पाश म्हणून आपण संसाराचे भावबंधनाचे ओझे वाहत राहतो. ती फेकणे आवश्यक जरी वाटली, तरीही ते टोचणारे नातेसंबंध घेऊनच फिरतो. संस्कार सुटत नाहीत. व तडजोड झेपत नाही. मग ते घर जपण्याचा खटाटोप का केला जातो? कळत नाही. घर आवर्तन पसारा फेकवत नाही. कारण त्या भोवती स्त्री उगीचच गोफ गुंफते. पसाऱ्यात रमते. जीव कि प्राण अशा पसरमय घरात गुंतलेल्या स्त्री ला मात्र बेघर करायला पुरुष एक क्षण पुरतो. एक कारण पुरते. कधी तरी विनाकारण तो तसे करू शकतो. कारण तो पुरुष असतो. स्त्रीने घर सोडले तर संयुक्तिक कारण सुद्धा विनाकारण किंवा क्षुल्लक कारण ठरते. महेर म्हणजे "जो पर्यंत नवर्याच्या घरी परत जाणार आहेस तो पर्यंत कधीही केव्हाही भरपूर राहा, मात्र नवरा सोडून येशील तर तेव्हा हे घर तुला बंद होईल, म्हणजेच तो दोन्ही कडे बेघरच!

एकमेकांची उणीदुणी काढणे म्हणजे नातेसंबंध का? जी व्यक्ती नाही तिच्या चुगल्या करणे हे माहेरी सासरी कॉमन असते. तसे पाहता, माहेरी तरी आधार कुठे असतो? असतात फक्त रम्य स्वप्ने व पुरातन कालीन आठवणींची नाणी जी वर्तमानकाळात व्यवहारात, कालबाह्य झाल्याने चालतच नाहीत. फेकली जावीत अशी! स्वतःच्या घरातील अनुमानावरून इतरांचे काय बोलायचे? पण लांड्या चादरीतून काही गोष्टी तर कळतातच.

खोलीत एखादा पुतळा,असावा असेच असलेले माणूस सुद्धा बाई सांभाळते, पुरुष मात्र हरहुन्नरी हरकाम्या स्त्रीला सुद्धा फेकून देतो. बायकोचा अपमान करून अस्वथ झालेला नवरा फारसा आढळत नाही पण त्या अपमानाने खूप अवघडलेली ती जखमी अवस्थेत फडफडत असते. राहते.

पाऊल थकले माथ्यावरती जड झाले ओझे
जिवलगा राहिले रे दूर घर माझे.
सर्वस्व अर्पूनि झाले, रिकामी तरी

माझ्या घरात मी पाहुनी बनले आहे
जाळावयासी उठून जेव्हा संसारातून जाशी गडनी
येति नराधमते नवीन बळी घेऊनि
माझी कविता शेतात जाते,
पावसातून जाताना
तिला छत्री नको कि इरले
निळे आभाळ पुरे म्हणते.

नवरोबा त्यांचा सलमान खान झालाय का? कि फक्त स्वार्थ?

ज्यन्य फसवणुकीच्या आठवणी आठवून जीव जाळतो. शिवाय उद्या परत हे सुरु होणार नाही याची हि खात्री नाही. माझे त्यांच्यावर प्रेम आहे पण ते लहरीने उठून जातात. घरी त्यांनी परत यावे हा अहंकार नाही. त्यांना रेअलाईस व्हावे.

पती पत्नी और वो भी व ती यामधील एकाच गोष्ट तो निवडू शकतो. रात्रभर चित्रविचित्र स्वप्न पडतात.

1 परीक्षा चालू आहे आणि प्रश्न पत्रिका दाखवणार नाही तुम्ही मनाने उत्तरे लिहा. "परीक्षक मलाच दम देतात" "मी लिहीन पण मग तुम्ही मला नापास कराल" मी हो त्याच्या साठीच हे चाललेय. परीक्षक हसून खुनशीपणे म्हणतात.

2. बॅग चोरलं गेली म्हणून मी फिरतेय. नवरा बहीण सर्वजण स्वतः च्या बॅग जवळ धरून बसले आहेत. माझ्या बॅग मध्ये चांद पतीचा नेकलेस आहे. जुन्या आठवणींची बॅग हरवली ? कि बाकी कुणाचेही एकवढे नुकसान झाले नाही जेवढे माझे झाले.

मला प्रसंगी मन कठोर करायला हवे जसे पूर्वी केले. एका विशिष्ट क्षणी ती व्यक्ती साफ मनातून उतरते. पुराव्यातून नवऱ्याची दुर्वर्तणूक सिद्ध झाली. त्यामळे मी भांडें म्हणून सर्वजण घाबरतात. आता त्यांची ग्यारेंटि कोणीच देत नाही. भांडणात दरवेळी मध्यस्थ कुठून आणायचे? देवानेच मध्यस्थी करावी म्हणून स्वप्नातच मी देवीची ओटी भरली व खाली वाकले. पदर पसरला आणि माझ्या हातात लाह्या बत्तासे दुधाची पिशवी देवीकडून प्रसाद म्हणून अली. मात्र त्या पिशवीला घाण लागली होती.

हाती धनुष्य ज्याच्या, त्याला कसे कळावे, हृदयात बाण ज्यांच्या त्यालाच दुःख ठावे. आपणच आपल्याला कधी कधी अनोळखी वाटू लागतो. घरासकट. वाळलेल्या



काड्यांतून, सुकलेल्या पानातून पक्षी घरे बांधतात. माती धागे, यांनी किडे घर बनवतात. फाटकी गोणपाट, नारळाच्या झावळया, शेण्या, यांनी माणूस घर बनवतो. जगण्याची इच्छा उमेद, आशा या गोष्टी त्याला त्या कष्ट करण्याला प्रेरणा देतात. कधी कधी मला मात्र काहीच करू नये असे वाटते. असे वाटते, सर्व प्रेरणा संपल्या आहेत. पंचवीस वर्ष पूर्वी जे गृहीतक धरून गणित बनवले ते गृहीतक चूक असल्याने चुकले. अमृता प्रीतम म्हणतात तास जीवनाचा कोपरा कुवराच आहे. "मेरी जिंदगी मी अजनबी का इंतजार है" हा इंतजार कदाचित तो देवाचा असेल, किंवा मृत्यूचा देखील असू शकेल. 80 वर्षाच्या सासूने तिच्या जगण्याच्या लालसेपोटी, सर्व सुनांना मृत्यूच्या दारात ढकलण्या इतके, छळले. टणक होत्या त्या, म्हणून त्या टिकल्या, मी फसले व जीवनाची, उमेद घराची ओढ सुद्धा थिजली.

माझ्या कोवळेपणाचा,अननुभवीपणाचा, या घरी, सर्वानीच फायदा करून घेतला. कोवळया पानांना चुरडावे तसे माझे मन दुखावणे हा सासूचा छंद होता. दिवसरात्र दूरदर्शन वरच्या हिंसाचारी मालिका पाहून त्या बिथरल्या होत्या. शिवाय हल्ली म्हाताऱ्याने सहानुभूती मिळते ती वेगळीच. सासू स्वतः मिटक्या मारून जेवल्यानंतर जेवणाच्या ताटावरच भांडण काढणे हा त्यांचा आवडता टाईमपास होता. कधीही गोडी गुलाबीत त्यांनी मला जेवू दिले नाही. सासू म्हणजे सारख्या सूचना. सारखी वखवख, सारख्या आज्ञा ! व सून म्हणजे सुन्न झालेली गुलाम. हजारजबाबीपणाने उखाणे गाणी, बनवून मी वातावरणात रंग भरत होते, तोपर्यंतच मी त्यांना हवी होते. जसे छोटासा बाळ आमच्या घरात आला. बाईला आजी बनवून गेला. या या आजीबाई या या या. पण माझा प्रश्न मी सांगताच त्यांना मी नकोशी झाले. मी कधी जाते असे वाटू लागले. कारण नाती फक्त आनंद व्यक्त करण्यापुरती होती. नवर्याच्या त्रासाचे वर्णन त्यांना माहित होते. पण त्यांना त्या कडे दुर्लक्ष करायचे होते. त्यांनी माझ्याकडे दुर्लक्ष केले संध्याकाळ झाली. पक्षी किलबिलाट करीत जेव्हा आपापल्या घरट्याकडे जाऊ लागले तेव्हा वाटले. माझे घर स्वतःचे कुठे आहे? या घरी मी स्वयंपाकीण, मोलकरीण आहे. या घरी मी सखी नाही, तो मन दुसरीचा! सासूने खुशीने व खुनशीपणे दुसऱ्या सखीला माझ्या जीवनात आणले. वर त्या पती -पत्नी- वो नात्याची भालावणंच केली. संसार बद्दल बोलायचे तर हे घर सासूचे, हे घर

सवतीचे, हे घर नवर्याच्या मैत्रिणीचे होते. माहेर बद्दल बोलायचे तर ते घर भावाचे वाहिनीचे, व समाजाला घाबरणाऱ्या आई वडिलांचे होते.

मी दोन्ही घरी पाहुणीच होते.

राहिले दूर घर माझे

तीन बाय सहा फुटाचा पलंग सुद्धा माझा नव्हता. आजारी असताना. तापातसुद्धा तिथे निजायची मुभा मला नव्हती. त्या घराची मालकीण सासू होती ती निजेपर्यंत मी निजू शकत नव्हते.

स्त्री हि देवी आहे असे म्हणतात. स्वतः च्या मुलांना जपणारी स्त्री दुसऱ्याच्या मुलाशी वाईट वागू शकते. त्यामुळे अधिक विचार केला तर वेगळेच सत्य दिसते. बिरबलाच्या गोष्टी सारखे, माकडीण स्वतःच्या स्वार्थासाठी स्वतःच्या पिल्लाच्या डोक्यावर पाय देऊन उभी राहते. माकडिणीची जगण्याची इच्छा इतरांच्या मरणाला कारणीभूत होते.

काय सांगू सखे सासुवास कास

वळचणीची वासा ;लगे ठसा ठसा

आता विचारांचे, चांगुलपणाचे, संस्कारांचे संसाराचे ओझे सुद्धा जड झाले आहे.



# ८९वानवळा

माहेरहून सासुरवाशिणीला पाठवली जाणारी भेट- भेट पेटी म्हणजे खाऊ वानोळा होय. वनोळयात काहीही असू शकते. कणसे, पापड, कुरडया, पुऱ्या, दशम्या, चिवडा,भडंग, लाह्या, काकवी गूळ, पेढे, वड्या चकल्या, मध्यन्तरी आईच्या हाताच्या लोणच्या बद्दल वाचले. ती कविता -

लोणच्याच्या बाराणीला जाता येता पाहू
मुरलेली माया आई तुझी रोज तोंडी लावू
लोणच्याची चव तोंडाला सुटे पाणी
माऊलीच्या आठवणीने डोळयात रोहिणी
जेथवर तुझी काया तेथवरच माया
माहेरच्या वाऱ्यासंगे तुझ्या प्रेमाची ग छाया
लोणच्याच्या बरणीत गच्च भरला आठव
माये तुझी फक्त आता खुशाली पाठव

आईच्या हाताची चव प्रत्येकालाच जन्मभर आठवते म्हणून तर प्रसिद्ध लोणच्याचे नाव मदर्स रेसिपी" आई ची पाककृती असे आहे.

आईच्या हाताच्या वरणभाताला सुद्धा अमृताची चव असते. तिचा तो भाताचा घास तुपाने चकचकीत झालेला असतो. शिवाय त्या घासाने बटाट्याच्या फोडीचे मोरपीस डोक्यावर खोवलेले असते. केळीच्या पानावरचे जेवण चांदीच्या ताटातील पंचतारांकित हूनही श्रेष्ठ . हिरव्या पाचूच्या हिराव्हा श्रावणात वेगवेगळया सणांमध्ये माहेरची आठवण गुंफलेली असते. माहेरहून कपडे लत्ते यावे या बरोबर आईच्या हाताचा खाऊ यावा हीच प्रमुख इच्छा असते. प्रत्येक व्यक्तीच्या हाताची चव वेगळी असते. बालपणी प्रथम खाल्लेले पदार्थ हे दीर्घकाळ स्मरणात राहतात. व म्हणूनच माहेरचा खाऊ हा जास्ती प्रिय असतो.

जेवणाच्या सहित जाते ते साहित्य त्यामुळेच लोकसाहित्यात वानवळी, श्रावण पारी, माहेरची न्याहारी, डबे, याला खूप महत्व आहे. अंगणातील फुलांचे गजरे, कैऱ्या,फळे, पेरू,भाज्या घरचा खरवस, शाळू, बेसनलाडू, परसातील भाजी, अळूवड्या श्रावणातील वानवळा वर्षभर आठवतो.

## ९१दूधावरची साय

बचपन के दिन क्या दिन थे

माझी नात गावाहून येणार म्हणून मी खुश होते. बऱ्याच दिवसांनी घरात दुपटी, बालोती,त्या बाललीला बघायला मिळणार होत्या. लहामुळं बरोबर वावराने म्हणजे सुखाची ठेव असते. माझ्या डोक्यात उद्याची स्वप्ने होती. नातवंडे येणार कि आई म्हणजे चैतन्याचा झरा बने. आजीच्या सुरकुतलेल्या हातात दहा हत्तीचे बाळ चढेच मी सुद्धा खूप खुश झाले. परंतु अचानक काही कारणाने नातीचे येणे रद्द झाले. हल्ली कुटुंब छोटी असतात. एकाच मूळ त्या भोवती घाईच्या घालणारे हेलिकॉप्टर पेरेंट्स, त्यांना नातीला माझ्या कडे पाठवायला नको वाटत होते. मी हिरमुसले. नाराजी घालवायला मैत्रिणीकडे गेले. ती म्हणाली. "अग सुटलीस, हागमूत काढत काळ वाया गेला असता. त्यांना काय पाळणाघर हवेच. माझे संस्कार मात्र घरात रामाऱ्यांचेच होते. वडील नेहमी म्हणत, घर जपावे.

पापाची वासना नको दावू डोळा<br>
नको मज कधी पररस्त्री संगती<br>
जनातून माती उठता भली

तुकाराम महाराजांनी समाजाला हे शिकवले आहे. म्हणून तर त्या माउली म्हणतात. त्यामुळे मला घर , कुटुंब, सर्वासाठी कष्ट करावेसे वाटते. ट्रीपला जाणे, सिनेमे बघणे, मॉल मध्ये फिरणे हा एकमेव आनंद वाटत नाही. पूर्वी शेजार दोन घरांची उघडी दारे, आत खेळती स्नेहल वारे, असा असे. हल्ली शेजार्यांचे बाळ वर्षातून दोनदा नजरेस पडते. कुणीतरी लहान मुलाला जवळ घ्यावे, त्याच्या जवळवरून हात फिरवावा असे कितीही वाटले,तरीही ते शक्य नसते. लहान मुलांशी खेळण्यात बालपणात असे काय असते? बालकांमध्ये आपण पूर्णपणे रमून जातो. त्याचे निरागसपण ते प्रश्न त्या बाललीला, तो हट्ट, ते रडणे, या सर्वांची एक ओढ असते. प्रत्येक मूल वेगळे असते. व प्रत्येक मुलाच्या रूपाने आनंद येतो. बालपण मागे सोडून



आलेले  वृद्ध, तरुणाईत रमणारे तरुण व मध्यमवयीन सर्वानाच बालकांशी खेळायला आवडते. स्त्रीची मूर्ती हातातल्या बालशिवाय पूर्ण होताच नाही.

एका ठिकाणी नातवंडांना दुधावरची साय म्हटले आहे. पु,ल. देशपांडेनि म्हंटले आहे. त्या प्रमाणे चड्डी न घालता आपल्या घरी डोकावणारे शेजाऱ्याचे मूलपण खूप आनंद देते. "फुला रे फुला तुला वास कुणी दिला " हा प्रश्न घेऊन त्यांच्या घरी शेजाऱ्यांचा मुलगा येई व पुलंना उत्तर देता आले नाही कि "आजोबा नापास झाले" असे म्हणत असे.लहान मुलांचे प्रश्न सुद्धा गमतीशीर असतात.

जंगल जंगल बात चली है
पता चला है
चड्डी पहेन के फुल खिला है

या ओळीने बालपण आठवते. आपल्या बालपणी कार्टून्स नव्हते कि बार्बी डॉल नव्हती. पण तरीही ते बालपण खूप आनंदी करणारे आजी आजोबा होते. टेडी बिअर ने भरलेले घर नव्हते. पण गोष्टींनी भरलेले अंगण होते. टीव्ही गाण्याच्या कॅसेट नव्हत्या, पण चित्रांची पुस्तके, खेळ, वाचनालये होती. खेळायला खूप सवंगडी होते. भावंडे होती. त्यांच्या बालपणाबद्दल कधी तरी आजोबा सांगायचे कि आम्ही सयाजीराव गायकवाड महाराजांकडे बडोद्याला शिकलो. आम्ही गरीब आजोबांची नातवंडे आहोत. तुम्ही श्रीमंत आजोबांची नातवंडे आहात. मनातल्या मनात मुरमुरे काहून अभ्यास करायचो. तुम्हा मुलांना अभ्यासाला मड हवा असतो. आई वडील नाही म्हणून आम्ही खूप रडायचो. तुम्हाला आई वडिलांना सोडून आधी मुंबईला व नंतर परदेशी पळायचे असते. आजोबाना नातवंडांशी खेळायला खूप आवडे. दिवाळी व मे मध्ये सर्व नातवंडांनी एकत्र जमलेच पाहिजे हा त्यांचा दंडक होता. गात्रे झडझडून सळसळणारे खेळ होते.

जुन्या पिढीतील नातवंडांचे कौतुक करायला मिळाले, आपल्या पिढीला नातवंडांशी फोनवर बोलून समाधान मानावे लागते. जुन्या पिढीतील चार महिने शाळेला सुट्टी असे. तेव्हा खरी सुट्टी व खऱ्या बाललीला करायला मिळत असत. आताच्या मुलांना सुट्टीत वेगवेगळे क्लास, संस्कार वर्ग अशा वेगवेगळया अँपॉईनमेंट असतात. आजीआजोबांकडे खुंदळाची सूट त्यांना चार महिने सुद्धा नसावी?

लहान मुलांचे बालपण आपण का हिरसकावून घेतो? आपापसातील मतभेद, अभिमानाच्या भिंती, यामुळे लहान मुलांना अलिप्त ठेवतो हे बरोबर आहे का? अशीच

पटापट वर्षे उलटून गेली तर हि मुले पटकन मोठी होतील, आणि मग म्हणतील मला बालपण आठवतच नाही. सारखी शाळा व क्लास यातच बालपण संपले.

तुमच्या बालकांना आजी आजोबांचा सहवास मिळावा त्यांना खेळाचा आनंद घेऊ द्या. आता मोठी होतील घरट्यातून उडून जातील. Time and fide never waits. Time does not have rewind button.

त्यांना बचपन के दिन उपभोगू द्या
त्यांच्या बरोबर तुम्हीही मुलात मूल व्हा
आठवा बचपन के दिन क्या दिन थे|



# ९२वाड्यांचा तो काळ

तेव्हा 1964 साली आम्ही त्या घरी राहायला गेलो तेव्हा मी शाळेत सुद्धा जात नव्हते. आजूबाजूला नाग साप होते. लांडगे सुद्धा यायचे. मागे अनेक गव्हाची शेते व द्राक्षाच्या बागा होत्या. साबरीचे रान वाढले होते व मागे एक पडीक वावर व एक डबके होते. त्यात रात्री बेडूक ओरडत असत. हमरस्ते तर नव्हतेच. पायवाटा होत्या. ज्या पावसाळ्यात हरवून जात. एक राजाची आई व दुर्गा नावाची मेंढपाळीण व गुराखीण  गुरं चरायला यायची. एकदा त्या दुर्गाबाईला पायाला खिळा लागून जखम झाली होती. आईला गावठी औषध माहिती होती. तिने अडाणीपणाने कणीस भाजून त्याची राख धूळ (फुफाटा) त्या जखमेत भरली होती. आई तिला खूप रागावली. डेटॉलने आईने तिची जखम धुतली, व त्यात हळद लावली. ती बाई आईला आशीर्वाद देत गेली. वाडा मग अनेक रुग्णांना वरदान ठरला. आई औषधोपचार करी. आज वाटते आईने इतक्या जणांची सेवा केली, सर्वांचे चांगले व्हावे म्हणून झिजली मग तो वाडा का तुटावा? वाड्या-बंगल्याचे आयुष्य साधारण शंभर वर्षे असते. अगदी कशाही दगड सिमेंटचा बनला असले तरीहि ... मग तो वाडा का तुटावा? म्हणे आमच्या आजोबांकडे खूप हिरे होते. पण बुजुर्ग लोक सांगत बोलत असत कि हिरे हे रक्तरंजित असतात. त्यांना ब्लडस्टेन्ड  कर्सर्ड डायमंड म्हणतात. ह्या हिऱ्यांना भाऊ बंदकीचा शाप असतो हे असे हिरे ज्या घरी जातात ते घर तुटते. अंधारातही प्रकाश पडणारे तेज, ते हिरे कुठे होते ते आम्हाला कुणालाही पुढच्या पिढीला कळले नाही. पण एक मात्र खरे कि त्या काळात सिमेंट ची जंगले नव्हती. एका वाड्याचा मृत्यू हा अनेक व्यक्ती रेखांचं मृत्य असतो. अंगणात पायात चाळ बांधून बागडणाऱ्या अर्धोन्मीलित कुमारिकेच्या कोवळया पायातला चाळ तुटून घुंगरू विस्कळितपणे पसरावे तसे हळूहळू आम्ही सर्व स्नेही दूर दूर पसरलो. किंवा मनाने दूर गेलो.

त्या वाड्याचा मृत्य हा एका संस्थानाचा मृत्यू होता. माझ्या बालपणाच्या अनेक आठवणींचा मृत्यू होता. अनेक रेशमी गोंडेदार वस्त्रांचे धागे सर्वदूर उसवून गेले होते.

सरकारनेच असे जुने वाडे वस्तू संग्रहालय, अभ्यासिका,पर्यटन स्थळ सेवा स्थळ. म्हणून किंवा अन्य कारणाने राखून ठेवण्यासाठी पुढाकार जरूर घ्यावा. तो वाडा आता फक्त फोटोत आणि आठवणीत उरला!

त्या वाड्यातील शेवटची दिवाळी मला संपूर्णपणे आठवते. त्यावर्षी ताईचे लग्न झाले होते. व माझे जवळ जवळ ठरले होते. भावाला कुणाचीही जबाबदारी उरणार नव्हती. तो खुशीत बसला होता. त्याची बायको बाळंतपणाला गेली होती.

फराळ होताच आम्ही अंगणात पणत्या लावायला गेलो. भाऊ म्हणाला," आटपा आपण फटाके आणायला जाऊया."

मी पटकन तयार झाले. पिवळया पंजाबी सूट मध्ये माझे रूप साजिरे दिसतेय अशी लांगुलचालन मामींनी केली. भावाला म्हटले, चल, मी चपला घालून येते"

पण निघताना चपलाच सापडेनात. भाऊ घाई करायला लागला,व म्हणाला, "चल बिन चपलांची!" मला खरेतर त्याचे ते बोलणे आवडले नाही, पण दिवाळीच्या आनंदात मला खास काही वाटले नाही. मी तशीच बिन चपलांची दगडावरून चालत फटाके आणायला गेले. पायाला दगड टोचत होते.

परत आलो तर सर्वजण वाट बघत होते. जेवायला आईने बिरडे घालून पुलाव केला होता. खंडोबाची सर्वांनी पूजा केली. देवाला नमस्कार केला. फटाके उडवायला जायचे म्हणून भावाच्या जवळ गेले. त्याची फटाक्याची पिशवी खूपच जाड वाटली म्हणून उघडून बघितले. त्या पिशवीत मोठ्या भावाने माझ्या चपला लपवून ठेवल्या होत्या. मी चालत गावात अनवाणी जावे म्हणून ह्याने असे केले असेल का? मी मनाला जाऊ दे" गफलत झाली असेल " असे समजावून पुन्हा त्या सुंदर दिवाळीच्या आनंदात रमले.

त्याकाळी रेडिमेड दिवाळी नसे. स्वतःच्या घराचा फराळ, घरी बनवलेले उटणे, सुंगंधीत अभ्यंग, मातीच्या पणत्या, रांगोळया, फुले, गप्पा, पत्ते, गाणी परवचे म्हणणे, नातेवाईकांसोबत देवदर्शनाला जाणे, ह्यातच कुटुंबात सर्वजण संतुष्ट असायचे. उठसुठ मॉल मधून खरेदी यात्रा न करता, दिवाळीची वाट बघण्यात आनंद मानला जाई. सणाला वाडे हे एक सांस्कृतिक संस्थान असे. भारदस्त व खानदानी आब व माणसांचा राबता वाड्यामध्ये असे. "भला उसकी साडी मेरी साडीसे सफेद कैसे?" असे हेव्यादाव्यांचे ईर्षेचे दिवस नव्हते. कि क-क -क च्या दूरदर्शनच्या मालिकांमुळे



पाळलेली व्यर्थ बिनडोक करमणूक नव्हती. गाणी, भजने, डोहाळे कौतुक गीते, पाळणे, अंताक्षरी ह्या निर्मल आनंदाचे दिवस होते.

रात्री गल्लीतील सर्व लहान मुले माझ्या वडील दादांजवळ जमली. दादांनी सर्वांना सुंदर गोष्टी सांगितल्या. माझ्या दादांची "टेल ऑफ टू सिटीज" ची गोष्ट मीही ऐकत बसले होते. भाऊ थोडा हट्टी व लाडावलेला होता. तो म्हणाला, " तिचे कशाला लाड करता? स्वयंपाक घरात काम करायला पाठवा "

दादा म्हणाले, "माझी झाशीची राणी आहे ती" अरे , पुढच्या वर्षी दिवाळीला सासरी जाईल"

लक्ष्मी पूजनाला अनारश्यांचा नैवेद्य केला, देवांची पूजा अर्चा केली. आईने गोरगरिबांना नोकरांना फराळ दिला. माझ्या वाड्याच्या ओटीवरून कुणीही सवाष्ण ओटी भरून न घेता गेली नाही. बाळाच्या टाळूवर तेल टाकायला आई सदा तत्पर असे. साक्षात लक्ष्मी होती माझी आई!

आईने मला तिची नऊवारी नेसवली. "पुढच्या वर्षी माझी लेक सासरी राहील" आईच्या मनात असलेल्या माझ्या भावी पतीबद्दल आईने लाडात चिडवले. स्वप्नांचे दिवस होते. अंगणातील प्रत्येकन प्रत्येक फळ झाडाखाली दिवा -पणती-तेलवात नाहीतर निरंजन तेवत होतेच होते. असे वाटत होते. आकाशातील चांदण्यांचं आज ह्या जमिनीवर उतरल्या आहेत. सर्वजण माझे कौतुक करत होते.

बेबल म्हणून एक मासा असतो. तो जर तुम्ही कानात ठेवलात तर प्रत्येक भाषा समजते. मला प्रेमाची भाषा समजली. वाड्याला पण नियतीची भाषा समजली असती तर आज पुण्यात, नगरला, नाशिकला सातार्‍यात वाडे संस्कृती टिकली असती.

त्याच वर्षी वाडा पडून तिथे सुंदर टॉवर बांधला गेला. मला वाटले होते, आपण त्या वाड्यात वाचनालय बनवावे. भावाने ज्यावेळी तो वाडा तोंडाला तेव्हा तो खरेदी करावा, जतन करावा, मात्र माझ्या कडे पैसे नव्हते. आता त्या ठिकाणी गेल्यावर माझ्या अश्रुनी त्या पाण्याने भरलेल्या डोळ्यांसारखी तुडुंब भरलेली विहीर, चाक व राहाट फक्त तिथे आहे. आजूबाजूच्या उंचउंच टॉवर्सनी त्या मॉल नि जीव दडपतो. खरेदीला पैसे नसतात, फिरायची भीती मॉल मध्ये वाटते. ते संस्कुर्तीक संस्कार जपणारा तो बंगला कधीच उंच टॉवर खाली जमीनदोस्त झाला आहे. झाडांना कधीच दूर करून लाकडे, वखारीत वर्ग करण्यात आली आहेत. पर्यावरणाचा, वसुंधरेच्या सार्थ

आणि मनःपूर्वक विचार कोण करणार? एक दिवस सर्वानाच हि श्रीमंती जग सोडून जायचे आहे. कौलारू घर आता फक्त माझ्या वाड्याच्या मनातील आठवणीतच उरले आहे. फोटो मध्ये पुस्तकांमध्ये, काही गावांमध्ये,प्रवासवर्णनामध्ये अजून असे वाडे जपणाऱ्या आदर्श पारंपरिक त्या अनाम पर्यावरवादीना लाख सलाम आणि त्या नसलेल्या वाडयांना सलाम! आणि तुटलेल्या वाडयांना श्रद्धांजली!



## ९३ वाचते व्हा.

पुस्तके वेगवेगळी, वर्तमानपत्रे, पत्रके, साप्ताहिके,वगैरे लिखाणातून लेखक संपादक विचार पेरत असतात. हे विचार सर्वदूर पसरले पाहिजेत, वाचले गेले पाहिजेत. त्यांच्यावर चर्चा व्हावी. कामामुळे हल्ली वाचायला वेळ मिळत नाही हि सबब पुढे येते. पुढची सबब पुस्तके हातात घ्यायला गाडीत जागा मिळत नाही.

दृक्श्राव्य माध्यमामुळे लिखित शब्द कमी झाले आहेत. मग लेखकांनी लिहायचे कशाला? टीव्ही कसा तो बघणे इतर काही करता करता शब्द कानी पडतात. मालिका बघता बघता कामे करीत भाजी निवडता येते. त्यामुळे लिखित पुस्तके. पोथ्या साप्ताहिके यांचे काम कमी झाले आहे. व मित्रावर ग्रंथलेख, पुस्तके, शब्द संपदा नष्ट होईल कि काय हि भीती निर्माण झाली आहे. दूरदर्शन वरील कार्यक्रमातील शब्दांचे आपले भ्रामक नाते नजरेचे असते. फास्ट फूड चे असते. स्पर्शाचे, हृदयाचे व जवळकीचे नाते फक्त पुस्तकांशीच असते. खरे तर पुस्तके वाचणे हे जीवनावश्यक आहे.

खरेतर शब्द म्हणजे गोलघुमटांचा नाद असतो. प्रत्यक्ष शब्दांच्या नात्यात अगदी कलाकार , रसिक नात्यात सुद्धा बोलताना जो शब्दानंद आपण देतो तेवढाच परत मिळतो. ज्या प्रमाणे शब्द घुमटात ध्वनीला प्रतिध्वनी येतो. सादाला मग तसाच प्रतिसाद मिळतो. उदा. नमस्कार- उत्तर येते धन्यवाद. उदा. भेट परत- जरूर

उदा. तुझी आठवण झाली- आभार मला सुद्धा झाली

कार्यक्रम आवडला का? हो करीत जा. शब्दरचना आपल्याला शब्द कुठे भेटतात ? सर्वत्र भेटतात. जागेपणी काय स्वप्नात सुद्धा भेटतात. सात रंगातून सृष्टी बनते, नऊ रसातून साहित्य बनते, तशी मोजक्याच स्वर व्यंजनातून बाराखडीतूनच वेद व पुराणे बनली आहेत. व नवं साहित्यही बनले आहे. व बनत आहे. व भविष्यत बनणार आहे. हे शब्द कधी अल्लड ब्लॅक बनून माझ्या अंगणात खेळतात तर कधी धीर गंभीर साधू सारखे बसून राहतात. जीवांच्या सहित जाते, ते साहित्य असते. त्याचा मूलकण (अणू) शब्द हाच आहे. पुस्तकासारखा मित्र नाही आणि वाचना सारखा छंद नाही.

# शुभांगी पासेबंद यांचे प्रकाशित साहित्य

1 मयूरमासा कादंबरी - 2012 - महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मुंबईतर्फे

(नवोदित अनुदान योजने अंतर्गत,हार्ड कोपी)

2. नाते शब्दांचे ललित - 2014 पुणे-हार्ड कोपी

3. मुलीही जन्माला येऊ द्या ललित-2015- पुणे-हार्ड कोपी

4. रंगकेशरी - कादंबरी- इ-बुक - 2015 बुकगंगा डोट कोम

5. बिलिव्ह इट ऑर नॉट- कथासंग्रह - इ-बुक - 2016बुकगंगा डोट कोम, विनामूल्य

6. कस्तुरी पक्षी- इ बुक- कादंबरी- इ साहित्य -2016 विनामूल्य

7. एक दिवा लावूया - स्तंभ संग्रह - 2016 बुकगंगा डोट कोम

8. जाईन मी विचारीत रानफुला- स्तंभ संग्रह - 2016 बुकगंगा डोट कोम

9. राहू दे घरटे- इ साहित्य – कादंबरी-2016 विनामूल्य



10. मी तुझेच गीत गात आहे- इ साहित्य - कादंबरी-2016 विनामूल्य

११ कृष्णकुसुमांजली-२०१६-स्तंभ संग्रह इ साहित्य- विनामूल्य

१२ आम्रकुसुमांजली -२०१६- स्तंभ संग्रह- इ साहित्य- विनामूल्य

१३ why did i fall in love? Amazon .com, Createspace,ई बुक

१४.( आगामी) मधुर दंश कथासंग्रह - पुणे, हार्ड कोपी

१५ (आगामी)- कुठे शोधिसी रामेश्वर- पर्यटन विषयक लेख-नागपुर-हार्ड कोप

१६ (आगामी)बेलाची पाने-स्तंभ संग्रह- ई बुक

१७ हे पुस्तक :रानफुलांचे थवे-२०१६-स्तंभ संग्रह -इ साहित्य-

सर्व पुस्तके ई बुक स्वरूपात उपलब्ध आहेत

ईसाहित्य प्रतिष्ठान ची सर्व पुस्तके विनामूल्य असतात

www.esahity.com

# शुभांगी पासेबंद



जर्नालिझम मध्ये गोल्डमेडल मिळवणाऱ्या आणि लोककला अकॅडमीमधून डिप्लोमा मिळवणाऱ्या शुभांगी पासेबंद (MSc. B. Ed.) एका बड्या बॅंकेचं मॅनेजरपद सोडून आता पूर्णवेळ लेखनात उतरल्या आहेत. ई साहित्यच्या वाचकांना त्यांच्या कादंबऱ्या माहित आहेतच. त्यांच्या कस्तुरीपक्षी, राहू दे घरटे आणि तुझेच मी गीत गात आहे या तिन्ही कादंबऱ्यांना वाचकांनी भरभरून प्रतिसाद दिला. या तिन्ही कादंबऱ्यांतून स्त्रीची विविध रूपे आणि स्त्रीजीवनातला संघर्ष यांची प्रचिती वाचकांपर्यंत नेण्यात त्या यशस्वी ठरल्या. यानंतर आलेले त्यांचे ललित संग्रह कृष्णकुसुमांजली व आम्रकुसुमांजली यांनाही वाचकांनी भरभरून दाद दिली.

छापील प्रकाशनांमध्येही शुभांगीजींचे नाव गाजत असते. लोकसत्ता, पुढारी, प्रहार, गांवकरी अशा अनेक वृत्तपत्रांतून त्या स्तंभलेखन करत असतात. आजवर त्यांचे जवळपास चारशे ललित लेख प्रसिद्ध झाले आहेत. याशिवाय स्त्री, ललना, मेनका, गृहलक्ष्मी, प्रतिभा अशा अनेक नियतकालिकांतून त्यांचे लेखन प्रसिद्ध झाले आहे. आजवर त्यांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले असून त्यात सावित्रीबाई फ़ुले पुरस्कार, महाराष्ट्र दीप पुरस्कार, प्रफ़ुल्ल दत्ता “कुशल संपादक” पुरस्कार व उत्कृष्ट समाजसेविका पुरस्कारांचा समावेश आहे. शुभांगीजींच्या “ क्या



इतनी बुरी हूं मैं मां" हा स्त्री भ्रूणहत्याविरोधी एकपात्री प्रयोग आणि " नाते शब्दांचे" हा कार्यक्रमाचेही अनेक प्रयोग होत असतात.

शुभांगी पासेबंद यांना त्यांच्या साहित्य, पर्यावरण आणि सामाजिक अशा त्रिविध सेवेसाठी ठाणे महापालिकेकडून ठाणे गौरव हा पुरस्कार महाराष्ट्राचे परिवहन मंत्री ना. एकनाथ शिंदे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला त्याबद्दल त्यांचे अभिनंदन.

ई साहित्य प्रतिष्ठानतर्फ़े शुभांगीजींना पुढील लेखनासाठी अनेकानेक शुभेच्छा.



# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान मराठी साक्षरांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी आणि लेखक व कवींना एक सशक्त व्यासपीठ मिळावे या दुहेरी हेतूने स्थापन झाले. मराठीत एक जबरदस्त वाचन संस्कृती निर्माण व्हावी, तरुणांनी भरपूर वाचन करावे, ग्रामीण भागातील तरुणांना मोबाईलवर पुस्तके उपलब्ध व्हावीत, परदेशस्थ मराठी वाचकांना सहजासहजी इंटरनेटवर पुस्तके मिळावीत हे आमचे स्वप्न. जगातील चाळीस देशांतील  सुमारे साडेतीन लाख वाचक या चळवळीचे सभासद आहेत. त्याशिवाय वर्षाला सुमारे तीस ते चाळीसलाख वाचक वेबसाईटवरून पुस्तके डाऊनलोड करतात.

अर्थात याने आमचं समाधान नाही. सुमारे बाराकोटी मराठी माण्सांपैकी किमान अर्धे म्हणजे सहा कोटी लोक "वाचक" व्हावेत अशी आमची इच्छा आहे. माउलिंनी सांगितलंय. "जो जे वांछिल ते तो लाहो". आमचीही वांछा "तो" पूर्ण करील. करीलच.

आमच्या वाचकांना एकच विनंती. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला पाठवा. अशा रितीने आपण तीनाचे तीस आणि तिसाचे तिनशे होऊ. या मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू व्हायला वेळ नाही लागणार. सर्वांची साथ असेल तर.

एवढी विनंती मान्य कराच.

ई मेल पत्ते esahity@gmail.com या पत्त्यावर पाठवा बरं!

